शोधप्रकाशन ग्रंथमाला- 62

ओवीबद्ध

# श्रीमन्मथचरितामृत

रचना

शेषनारायण देवाप्पा पसारकर

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**
डी. ३५ / ७७, जंगमवाडी मठ,
वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१

श्रीमन्मथचरितामृत (मराठी)
रचना : शे. दे. पसारकर

Shree Manmath Charitamrit (Marathi)
By S. D. Pasarkar

ISBN : 978-93-82639-02-2

अक्षरसंयोजन : शिवशक्ती कम्प्यूटर प्रोसेस
जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१ ००१



मुद्रण : मित्तल ऑफसेट, सुंदरपुर, वाराणसी (उत्तर प्रदेश)
पहिली आवृत्ती : माघ शु. ५ शके १९१६, ४ फेब्रुवारी १९९५
दुसरी आवृत्ती : मार्च १९९५
तिसरी आवृत्ती : सप्टेंबर २००२
चौथी आवृत्ती : २८ नोव्हेंबर २०१२ (श्रीमन्मथपौर्णिमा)
पाचवी आवृत्ती : ३१ मार्च २०१४ (गुढी पाडवा)

मूल्य : वीस रुपये



श्रीकाशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

## श्री १००८ जगद्‌गुरू डॉ० चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी

जंगमवाडी मठ, श्रीक्षेत्र काशी (वाराणसी) यांचे

# शुभाशीर्वचन

वीरशैवधर्म सनातन असून त्याची स्थापना युगायुगांत जगद्‌गुरू पंचाचार्यांनी केली, असे आगमादी ग्रंथांत म्हटले आहे. श्रीरंभापुरी, श्रीउज्जयिनी, श्रीकेदार, श्रीशैल आणि श्रीकाशी या पवित्र क्षेत्रांत पंचाचार्यांनी स्थापन केलेली पंचपीठे आहेत. या पंचपीठांचे शाखामठ मध्यप्रदेश, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, तमिळनाडू, राजस्थान आणि हरियाणा आदी प्रांतांत मोठ्या संख्येने आहेत. महाचार्यांच्या आदेशानुसार शाखामठांवरील शिवाचार्य आपल्या परिसरातील शिष्यवर्गाला आणि इतर लोकांना शिवदीक्षा देऊन ज्ञानोपदेश करीत, लोकांच्या मनात धर्मभावना जागी करीत. ही परंपरा आजदेखील चालू आहे.

सोळाव्या शतकात महाराष्ट्र परधर्मीयांच्या प्रभावाखाली गेला. राजकीय स्थित्यंतरामुळे वीरशैवधर्मावरही संकट आले. परधर्मीयांचा जुलूम आणि दुसरीकडे वारकरी संप्रदायातील भक्तिपूर्ण अभंगांचे आणि कीर्तनाचे आकर्षण यांत वीरशैव समाज सापडला. आपल्या कुळातली शिवभक्तीची परंपरा त्यागून बहुसंख्य वीरशैव विठ्ठलभक्त झाले. अशा बिकट परिस्थितीत संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामींचा अवतार झाला. त्यांनी पूर्वसूरींच्या साहित्याचा अभ्यास केला. वाट चुकलेल्या वीरशैवांना सन्मार्ग दाखविण्यासाठी परमरहस्य, गुरुगीता, अनुभवानंद, ज्ञानबोध, स्वयंप्रकाश इत्यादी ग्रंथ रचले. अभंगरचना करून शिवभक्तीचे माहात्म्य लोकांना पटवून दिले. ज्यांना कीर्तन-भजनाची गोडी होती व जे त्यासाठी वारकरी पंथाकडे

वळले होते, त्यांच्यासाठी श्रीमन्मथस्वामींनी शिवकीर्तनाची परंपरा निर्माण केली. ज्यांना अभंग-गायनाची गोडी होती त्यांच्यासाठी शिवभक्तिपर अभंग लिहिले. ज्यांना भारुडे गाण्याची हौस होती त्यांच्यासाठी भारुडे लिहिली, पदे लिहिली. लोकांना ज्या गोष्टींमुळे वारकरी पंथाचे आकर्षण वाटले होते त्या सर्व गोष्टी श्रीमन्मथस्वामींनी वीरशैवधर्मात समाविष्ट करून लोकमनाशी नाते जोडले आणि धर्मभ्रष्टांना मार्गावर आणले. त्या काळात श्रीमन्मथस्वामींचा अवतार झाला नसता तर महाराष्ट्रात वीरशैवांची काय अवस्था झाली असती याची कल्पनादेखील करवत नाही. म्हणून मराठी वीरशैवांवर श्रीमन्मथस्वामींचे एवढे उपकार आहेत की ते कधीच फिटणे शक्य नाही.

माणूरमठाचे पट्टाधिकारी श्रीबसवराज शिवाचार्य स्वामीजी यांच्या आशीर्वादाने शिवलिंगस्वामी आणि पार्वती या दंपतीच्या उदरी निनगूर (नेकनूर) या गावी माघ शुद्ध पंचमी, शके १४८२ या दिवशी श्रीमन्मथस्वामींचा जन्म झाला, असे बसवलिंग या वीरशैव संतकवीने लिहिलेल्या 'मन्मथजन्माचे अभंग' या रचनेत नमूद केले आहे. श्रीमन्मथस्वामींचा जन्म ही महाराष्ट्रातील वीरशैवांसाठी फार महत्त्वाची घटना होती. श्रीमन्मथस्वामींचे सर्वस्पर्शी कार्य पाहिल्यावर त्यांच्या रूपाने शिवानेच अवतार घेतला होता असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. म्हणून शिवभक्त त्यांना 'मन्मथमाउली' असे अत्यंत श्रद्धेने संबोधतात.

श्रीमन्मथस्वामीसारख्या थोर संताचे चरित्र गद्यरूपात लोकांसमोर आले आहे. परंतु आजपर्यंत ते ओवीबद्ध रूपात उपलब्ध नव्हते. ही उणीव दूर होऊन प्रत्येक श्रद्धावंताला श्रीमन्मथस्वामींच्या चरित्राचे पारायण घडावे, त्यांच्या कार्याचा आणि साहित्याचा परिचय व्हावा या उद्देशाने डॉ. शे. दे. पसारकर यांनी 'श्रीमन्मथचरितामृत' या ओवीबद्ध चरित्राची रचना केली. वीरशैव संतांच्या ओवीबद्ध चरित्रलेखनाची खंडित झालेली परंपरा त्यांनी पुन्हा जागवली आहे. डॉ. पसारकरांनी श्रीमन्मथस्वामींच्या 'परमरहस्य' या ग्रंथावर शोधप्रबंध लिहून शिवाजी विद्यापीठाची पीएच्.डी. पदवी संपादन केली आहे. त्या निमित्ताने श्रीमन्मथस्वामींच्या चरित्राचा आणि साहित्याचा त्यांनी सखोल अभ्यास केला आहे. शोधप्रबंध लिहिणाऱ्या

आणि संशोधनक्षेत्रात वावरणाऱ्या व्यक्तीने भाविकतेने ओवीबद्ध ग्रंथ लिहिला असे उदाहरण शोधून देखील सापडणार नाही. चिकित्सकबुद्धी आणि श्रद्धा यांच्या समन्वयाचे हे उत्तम उदाहरण आहे.

'श्रीमन्मथचरितामृत' हा ओवीबद्ध ग्रंथ सुबोध आणि प्रासादिक आहे. भाविकांना पारायणासाठी अत्यंत उपयुक्त आहे. या ग्रंथाच्या पारायणाने श्रीमन्मथस्वामींच्या चरित्राचे व तत्त्वज्ञानाचे सर्वांना आकलन होईल. गेल्या चारशे वर्षांपासून श्रीमन्मथस्वामींच्या ओवीबद्ध चरित्राची असलेली उणीव या ग्रंथामुळे दूर झाली आहे. यामुळे सर्व भाविकांना आनंदच होईल.

डॉ. शे. दे. पसारकरांनी वीरशैव साहित्यासाठी स्वत:ला वाहून घेतले आहे. आतापर्यंत अनेक ग्रंथ लिहून, संपादित करून त्यांनी वीरशैव साहित्याची सेवा केली आहे. 'जन्म हा अखेरचा' या बृहद् ग्रंथामुळे ते सर्वांना परिचित झाले आहेत. त्यांनी कविता, कादंबरी, संतकाव्यविवेचन, चरित्र, तत्त्वज्ञान, संपादन, संशोधन, अनुवाद अशा विविध प्रकारची साहित्यनिर्मिती केली आहे. त्यांच्या विपुल व वैविध्यपूर्ण साहित्यसेवेमुळेच त्यांना २००४ मध्ये लातूर येथे झालेल्या पहिल्या 'अखिल भारतीय वीरशैव मराठी साहित्य संमेलना'चे अध्यक्षपद देण्यात आले.

यापुढे देखील त्यांच्याकडून साहित्यसेवा घडणार आहे. त्यांनी नुकतीच 'श्रीसिद्धान्तशिखामणि-तत्त्वामृत' या ओवीबद्ध ग्रंथाची रचना केली आहे. 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या वीरशैव धर्मग्रंथावरील हे ओवीबद्ध मराठी भाष्य असून येत्या एक-दोन महिन्यांत हा ग्रंथ प्रकाशित होणार आहे. त्यांनी श्रीकाशीपीठामध्ये सपत्निक वास्तव्य करून अवघ्या दोन महिन्यांत साडेतीन हजारांपेक्षा अधिक ओव्या रचून हा ग्रंथ पूर्ण केला. पसारकरांच्या क्रियाशक्तीला व ज्ञानशक्तीला उत्कृष्ट भावनेचे बळ लाभल्यामुळे त्यांच्याकडून एवढे मोठे कार्य अल्प काळात पूर्ण झाले आहे. या कार्यात त्यांच्या सुविद्य धर्मपत्नी सौ. उषाताई यांचेही मोठे योगदान आहे. जसजसे लेखन होत गेले तसतसे संगणकीय अक्षरजुळणीचे निर्दोष कार्य

अक्षरजुळणीचे निर्दोष कार्य उषाताईनी पार पाडले. या दंपतीचे कार्य पाहून आम्ही संतुष्ट झालो आहोत. या दंपतीला उत्तम आयुरारोग्य लाभून त्यांच्याकडून भावी काळात अशीच सेवा घडो, असा जगद्गुरू पंचाचार्य, श्रीकाशीविश्वनाथ आणि माता अन्नपूर्णा यांचा अनंत मंगलाशीर्वाद!

काशीजंगमवाडी मठाच्या शिवधर्मग्रंथमालेतून ४० वे पुष्प म्हणून हा ग्रंथ ४ फेब्रुवारी १९९५ या दिवशी, मन्मथस्वामींच्या ४३४ व्या जन्मदिनी कपिलधार येथे प्रकाशित झाला. त्याची पहिली आवृत्ती तत्काळ संपली. म्हणून मार्च १९९५ मध्ये दुसरी आवृत्ती काढावी लागली. २००२ मध्ये लातूर येथे सौ. सुमित्रा शिवशंकर खानापुरे व सौ. सुशीलादेवी जगदेवस्वामी देवणीकर यांच्या अर्थसाहाय्याने तिसरी आवृत्ती प्रकाशित झाली. कपिलधार येथील श्रीमन्मथस्वामी देवस्थानचे पुजारी श्री. वे.मू. नागनाथ बाबूअय्या स्वामी यांनी चौथी आवृत्ती प्रकाशित करण्याचा आग्रह धरला आणि त्यासाठी अर्थसाहाय्य केले.

आज शैवभारती शोधप्रतिष्ठानतर्फे ही पाचवी आवृत्ती प्रकाशित होत आहे. तिसऱ्या व चौथ्या आवृत्तीसाठी अर्थसाहाय्य करणाऱ्या शिवभक्त दात्यांना अनंत मंगलाशीर्वाद.

'श्रीमन्मथचरितामृत' या मराठी ओवीग्रंथाचे सद्भक्तांनी श्रद्धापूर्वक विधियुक्त पारायण करावे आणि भोग-मोक्ष प्राप्त करून आपल्या आपल्या जीवनाचे सार्थक करून घ्यावे.

या ग्रंथाचे पठण-पारायण करणारे सद्भक्त, ग्रंथातील ओव्यांचे अर्थ स्पष्ट करून सांगणारे अर्थविवेचक आणि हा ग्रंथ श्रवण करणारे भाविक स्त्री-पुरुष श्रोते या सर्वांना अनंत मंगलाशीर्वाद!

जंगमवाडी मठ, वाराणसी

३१ मार्च २०१४

इत्याशिषः

# मनोगत

संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामी यांच्या जन्माला ४५० वर्षे झाली. गेल्या चार शतकांत श्रीमन्मथस्वामींचे ओवीबद्ध चरित्र कोणी लिहिले नसावे. लिहिले असते तर ते उपलब्ध झाले असते. वीरशैव संतकवी बसवलिंग यांनी लिहिलेले 'श्रीमन्मथजन्माचे अभंग' आणि 'श्रीमन्मथसमाधीचे अभंग' उपलब्ध आहेत. मन्मथस्वामींचे चरित्रकथन करणारा एवढाच पुरावा ज्ञात आहे. 'शिवयोगी श्रीमन्मथस्वामी : चरित्र, वाङ्मय व कार्य' या नावाने श्रीमन्मथस्वामींचे गद्यचरित्र कुमार कोठावळे यांनी लिहिले असून ते मन्मथस्वामी देवस्थान पंचकमिटीने १९७३ मध्ये प्रकाशित केले आहे.

ओवीबद्ध चरित्र ही भाविक समाजाची गरज आहे. गद्यचरित्राचे पठण-पारायण करता येत नसते. ओवीछंदाबद्दल मराठी लोकमानसात अतीव श्रद्धा आहे. म्हणून ओवीबद्ध रचना अत्यंत भक्तिभावाने वाचली जाते. श्रीमन्मथस्वामींच्या चरित्रावर चिकित्सक लेखन करून देखील मला सदैव वाटत आले आहे की मन्मथस्वामींवर श्रद्धा ठेवणारा भाविक वर्ग संशोधनपर लेखन वाचत नाही. धर्माचरणावर अपार निष्ठा ठेवणाऱ्या या शिवभक्तांची गरज वेगळीच आहे. गद्यचरित्र आणि संशोधनपर लेख त्यांची गरज भागवू शकत नाहीत. त्यांच्या हातात श्रीमन्मथमाउलीचे ओवीबद्ध चरित्रच ठेवले पाहिजे. याच प्रेरणेतून 'श्रीमन्मथचरितामृता'ची निर्मिती झाली.

श्रीमन्मथस्वामी हे मराठीतील पहिले लावणीकार होत. त्यांनी पूर्वायुष्यात शाहिरीचा छंद जोपासला. नंतर ते धर्माकडे वळले. परमहरस्य, गुरुगीता, ज्ञानबोध, अनुभवानंद, स्वयंप्रकाश इत्यादी ओवीबद्ध ग्रंथ आणि अभंग, भारुडे, पदे आदी स्फुट कविता त्यांनी रचली. स्वधर्मभ्रष्ट वीरशैवांना धर्माचरणाकडे वळवले. महाराष्ट्रात वीरशैवधर्म टिकवून ठेवला, दृढमूल केला. मन्मथस्वामींचे जीवन म्हणजे एका शाहिराचे एक संतात झालेले परिवर्तन होय. मराठीत ग्रंथरचना करून त्यांनी

मराठी वीरशैवांना तात्त्विक अधिष्ठान प्राप्त करून दिले आणि स्वधर्माच्या तत्त्वज्ञानाची व आचारांची ओळख करून दिली. त्यांनी अभंगरचना करून आपल्या हृदयातील शिवभक्तीला शब्दरूप दिले आणि शिवभक्तीला अभंगरूप देण्याचा मार्ग पुढिलांसाठी खुला करून ठेवला. ओवी आणि अभंग हे मराठी मातीत रुजलेले छंद आहेत. या छंदांत रचना केली तर मराठी माणसाच्या काळजाला आपण स्पर्श करू शकतो हे मन्मथस्वामींनी सर्वप्रथम ओळखले. त्यांच्यानंतरच अभंगरचना करणाऱ्या अनेक पिढ्या वीरशैव समाजात उत्पन्न झाल्या.

श्रीमन्मथस्वामींचे चरित्र मोठे विलक्षण आहे. त्यांच्या चरित्रात चमत्कारकथा नाहीत. परंतु 'विठ्ठल विठ्ठल' जयघोष करणाऱ्या शिवभक्तांच्या वंशजांना त्यांनी 'शिव शिव' म्हणायला भाग पाडले. 'तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा' असे म्हणणाऱ्या जिव्हेला त्यांनी 'माझे जीवीचे जीवन । देव पार्वतीरमण' असे गायला शिकविले. 'शिव नाद शिव छंद । वाचे शिव स्मरावा । शिव अवघा प्रेमानंद । सदाशिव स्मरावा' असे शिवनामाचे माहात्म्य पटवून देऊन डोलायला लावले. हेच त्यांच्या चरित्रातले चमत्कार होत. शिवभक्ताच्या वंशजाने गळ्यात तुळशीमाळ घातलेली पाहून मन्मथस्वामींना संताप येतो. विष्णुभक्ताच्या वंशजाने गळ्यात तुळशीमाळ घातली तर ते संतापत नाहीत, याकडे सर्वांनी लक्ष द्यायला हवे. शिव आणि विष्णू ही एकाच परब्रह्मतत्त्वाची भिन्न नामरूपे आहेत. परंतु धर्माचरणात एकनिष्ठा आणि एकदेवतार्चन आवश्यक असते. म्हणून शिवभक्ताच्या कुळात जन्म घेतलेल्या माणसाने शिवाचीच भक्ती करावी असा मन्मथस्वामींचा आग्रह आहे.

मन्मथस्वामींच्या जन्मापूर्वीची लोकस्थिती, मन्मथस्वामींचा जन्म, त्यांच्या व्यक्तित्वाची जडण-घडण, त्यांची विचारपद्धती, त्यांचे साहित्य आणि त्यांचा समाधिप्रसंग हे सारे क्रमवार ओवीछंदात लिहावे, अशी प्रेरणा झाली आणि हे 'श्रीमन्मथचरितामृत' लिहून झाले. श्रीमन्मथमाउलीलाच ही सेवा माझ्याकडून करवून घ्यायची होती अशी माझी श्रद्धा आहे.

आमचे स्नेही मुंबईचे श्री. मधुसूदन लिंगे यांच्या प्रेमळ सल्ल्यामुळे १९८७ मध्ये पुण्याच्या 'वीरशैव दर्शन' मासिकाकडे

मी हे चरित्र पाठवले आणि त्यांनी ते क्रमश: प्रकाशित केले. श्री. लिंगे आणि 'वीरशैव दर्शन'चे संपादकमंडळ यांचा मी आभारी आहे. परंतु आता ग्रंथरूपात प्रसिद्ध करण्याआधी हे चरित्र परिष्कृत केले आहे, याची कृपया नोंद घ्यावी.

परमपूज्य श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या आज्ञेवरून हे ओवीबद्ध चरित्र प्रकाशित करण्याचे ठरले. शैवभारती भवन, वाराणसी या संस्थेने प्रकाशनाचे दायित्व स्वीकारले. त्यामुळे भाविकांसाठी हे मन्मथचरित्र ग्रंथरूपात सिद्ध झाले आहे. श्रीकाशीमहास्वामींच्या मंगलाशीर्वादामुळे माझे जीवन धन्य झाले आहे.

ज्या भाविकांसाठी हे लेखन झाले त्यांच्यापुढे ही कृती नम्रतापूर्वक ठेवत आहे.

'उषास्वप्न', १२६ ब, मार्कंडेय नगर, सोलापूर (महाराष्ट्र) **शे. दे. पसारकर**
२६ जानेवारी १९९५

## पाचव्या आवृत्तीच्या निमित्ताने

या ग्रंथाचे कपिलधार येथे पारायण होत असते, असे सांगून देवस्थानचे पुजारी श्री. नागनाथ बाबूअय्या स्वामी यांनी वाराणशीला प.पू. श्रीकाशीमहास्वामीजींना हा ग्रंथ पुनर्मुद्रित करण्याची प्रार्थना केली व त्यासाठी अर्थसाहाय्य देण्याचे दायित्व स्वीकारले. त्यांच्या आग्रहामुळे चौथी आवृत्ती प्रकाशित झाली. आता भाविकांसाठी ही पाचवी आवृत्ती प्रकाशित होत आहे. या ग्रंथाची नव्याने संगणकीय अक्षरजुळणी श्री. चिदानंद हिरेमठ (वाराणसी) व सौ. उषा पसारकर (सोलापूर) यांनी केली. डॉ. जी. सी. केंडदमठ, वाराणसी यांनी मुद्रणासाठी साहाय्य केले. या सर्वांना धन्यवाद.

जंगमवाडी मठ, वाराणसी, ३१ मार्च २०१४ (गुढीपाडवा) **शे. दे. पसारकर**

संसारश्रांतांची साउली । श्रीसंत मन्मथमाउली ।
तिच्या पवित्र पाउली । समर्पित ग्रंथ हा ।।

---


| अध्याय | ओवीसंख्या | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| अध्याय पहिला | ७० | १ |
| अध्याय दुसरा | ८८ | ७ |
| अध्याय तिसरा | ९२ | १४ |
| अध्याय चौथा | १३१ | २१ |
| अध्याय पाचवा | ९५ | ३१ |
| अध्याय सहावा | १०१ | ३८ |
| अध्याय सातवा | ११६ | ४६ |
| | एकूण ओव्या ६९३ | |

# अध्याय पहिला

।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीजगद्‌गुरु पंचाचार्येभ्यो नमः ।। श्रीमन्मथस्वामिने नमः ।। श्रीपलसिद्धाय नमः ।। ॐ नमो गणनायका । एकदंता विघ्नहारका । विशालबुद्धे विद्यादायका । वक्रतुंडा शिवसुता ।।१।। वर्षूनि कृपाचंद्रिकाजळ। उमलवी माझे चित्तकमळ। दरवळावा कथापरिमळ । मन्मथस्वामी चरित्राचा ।।२।। आज इच्छा उदेली मानसी । की गावे मन्मथचरित्रासी । तोषवावे भाविक श्रोत्यांसी । म्हणूनि तुजसी आळविणे ।।३।। सारस्वतांची स्फूर्तिदायिनी । देवी शारदा विश्वमोहिनी । ब्रह्मसुता वीणावादिनी । ती आदरे वंदिली ।।४।। नसे साहित्याचा अभ्यास । न कळती काव्यगुणदोष । केवळ रचनेची हौस। म्हणूनि येथ प्रवर्तलो ।।५।। तुझ्या कृपेने शारदे । लिहीन अक्षरे पदे । म्हणूनि मजसी वर दे । माये ग्रंथरचनेचा ।।६।। रेणुक दारुक एकोरामाराध्य । पंडित आणि विश्वाराध्य । हे पंचाचार्य प्रसिद्ध । त्यांना नमन माझे असो ।।७।। पंचपीठावरी जाण । जे आचार्य विद्यमान । त्यांना माझे नमन । सर्वकाळ असावे ।।८।। सुप्रसिद्ध प्राचीन पीठ । काशीजंगमवाडी मठ । ज्ञानसिंहासन ज्ञानपीठ । विश्वाराध्य जगद्‌गुरूंचे ।।९।। आरूढ ज्ञानसिंहासनी । श्रीचंद्रशेखर महास्वामी । उगवे जैसा तरणी ।

अंतराळी तेजस्वी ।।१०।। दूर करूनि अज्ञान । स्वत्वाचे करवावे भान । ऐसे धर्मजागरण । जगद्गुरूंनी आरंभिले ।।११।। त्या प्रबुद्धा ज्ञानवंता । चरणावरी ठेवूनि माथा । नमस्कारिले मी आता । अत्यादरेकरून ।।१२।। नमो स्वामी पलसिद्ध । ज्यांची योगलीला अगाध । साखरखेरडे ग्राम प्रसिद्ध । तेथे पलसिद्ध समाधिस्थ ।।१३।। त्या पट्टस्थानी अभिषिक्त । स्वामी सिद्धलिंग सांप्रत । मी त्यांचा अनुग्रहीत । नमन माझे तयांना ।।१४।। नमन ज्ञानेश्वरादी संतांसी । बसव-प्रभुदेवादी शिवशरणांसी । परम भाविक श्रोत्यांसी । नमन माझे त्रिवार ।।१५।। मन्मथस्वामी शांतलिंग । लिंगेश्वर शिवलिंग । लक्ष्मण बसवलिंग । या संतांना नमस्कार ।।१६।। आता श्रोतेहो सावधान । द्यावे मजकडे अवधान । मन्मथ शिवलिंगांचे आख्यांन । निवेदीन तुम्हापुढे ।।१७।। या मराठीच्या नगरी । सोळाव्या शतकाभीतरी । कैसी झाली नवलपरी । आकांत वर्तला अपार ।।१८।। विद्यारण्य मुनींचे स्वप्न सुंदर । हरिहर-बुक्काचे विजयनगर । मुस्लिमांनी केले सर । आणि धुळीस मिळविले ।।१९।। बहामनी राज्यातून । जहाल्या पाच शाह्या स्थापन । महाराष्ट्र देश आणि दक्षिण । आधिपत्याखाली आणली ।।२०।। म्लेंच्छ राज्यव्यवस्थेत । हिंदूंची झाली वाताहत । रक्षणकर्ता समर्थ । उरला नसे कोणीही ।।२१।। धर्म लोपला केवळ । दूषित झाले सरिताजळ । मनामनांतून साचला गाळ । अन्याय-अत्याचाराचा ।।२२।। कुलवधूच्या

डोईचा पदर । कोठेही राहिना स्थिर । माजला उन्मत्त अनाचार। हिंदू स्त्रिया भ्रष्टल्या ।।२३।। उधळीत वासना-रंग । थयथया नाचे अनंग । झाले किती शीलभंग । नीतिमत्ता लोपली ।।२४।। मायबहिणींचे वक्ष । होती उघडे सर्वांसमक्ष । कोणी नाही समर्थ दक्ष । अन्यायासी रोधाया ।।२५।। भग्न झाली देवळे । शिल्पांचे फुटले नाक-डोळे । कलाकृतीवरती बसले । अरसिकांचे घण-घाव ।।२६।। पर्वत्यांचे झाले पीर । मशिदीत लोपले मंदिर । भगवा रंग ओघळून त्यावर। हिरवे निशाण फडकले ।।२७।। धेनुहत्या हे नित्यकर्म । प्रजापीडन हाचि धर्म । ऐसा वर्तला अधर्म। महाराष्ट्र देशी तेधवा ।।२८।। ब्राह्मण होती मुसलमान । क्षत्रिय त्यागिती पराक्रम । वैश्यादी वर्णांची दारुण । अवस्था काय सांगावी? ।।२९।। मुके झाले वेदग्रंथ । स्तब्धले रुचिर उषासूक्त । ब्राह्मणमुखी स्त्रवत । आयता कुराणेशरीफच्या ।।३०।। वादळे मानसी रिचवून । लोक जगती प्रेतासमान । ब्र उच्चारण्या मुखातून । समर्थ नसे कोणीही ।।३१।। ऐसी सुल्तानी निष्ठुर । अस्मानी संकट कोसळे त्यावर । अवर्षणे जळाले अंकुर । सुफल सजला भूमीचे ।।३२।। खावया मिळेना भाकर । पोटी भडकला वैश्वानर । केवळ माजला अनाचार । कोणी नसे कोणाचे ।।३३।। पोटाकारणे करती चोरी । धोत्रे पात्रे पळवती दुरी । देखता विषाद भरे अंतरी। कोणा विवेकशीलाच्या ।।३४।। न देखवे ऐसा आकांत । परपीडने दुःखी चित्त । मग मुखातून

आर्त । फोडियेला हंबरडा ।।३५।। 'दार उघड बये दार । दार उघड बये दार' । ऐसा आदिशक्ती-समोर । पदर पसरिला संताने ।।३६।। त्यांचे नाव एकनाथ । जे दत्तसंप्रदायी संत। ज्यांनी वारकरी पंथ । स्वबळाने उजळला ।।३७।। केले ज्ञानेश्वरीचे परिष्करण । रचिले भावार्थरामायण । भागवतादी ग्रंथ रचून । लोकमानसा धैर्य दिले ।।३८।। निष्प्राण वारकरी पंथ । केला पुन्हा संजीवित । अंतराळी दुमदुमत । नामघोष विठ्ठलाचा ।।३९।। दिंड्यापताकांचे भार । गर्जे पुन्हा भीमातीर । अभंगांचा मधुस्वर । नाचे भीमाजळावरी ।।४०।। तरणी झाकिला जलदजाळे । वायू सुटता जाळ वितुळे । मागुती प्रकाश उजळे । तैसा पंथ उजळला ।।४१।। भजन पूजन संकीर्तन । सकळ मळभ गेले विरून । जागे झाले मराठी मन । सिद्ध होई सत्कार्या ।।४२।। आधी शेताची नांगरणी । मग करावी लागे पेरणी । तैसी संतांची करणी । मराठी मन नांगरले ।।४३।। जैसा पंचानन निद्रिस्त। तैसे महाराष्ट्र-शौर्य समस्त । ते जागविण्यास संत । कष्ट घेती अपार ।।४४।। असो एकनाथांच्या काळी । महाराष्ट्री चेतना संचरली । वारकऱ्यांच्या प्रभावाखाली । मराठी जन झणी आले ।।४५।। होई विठ्ठलाचा गजर । अबीरबुक्के भरले अंबर । टाळ-मृदंगाच्या तालावर। दिंड्या येती पंढरीसी ।।४६।। झाले अवघेचि वैष्णव । कोणासी आठवेना शिव । पंचाचार अष्टावरण सर्व । षट्स्थला विस्मरले ।।४७।। डोळिया दिसेना शिवभक्त । वर्जिले शिवाचार

समस्त । वीरशैव कुळीचाही भक्त । गळा घाली जानवे ।।४८।। त्रिपुंड्र रेखेना भाळी । मुखी नाही शिवनामावळी । लिंग-रुद्राक्ष भूषणे सगळी । सर्वही जन त्यागितीं ।।४९।। ऐसा विसरूनि स्वधर्म । अंतरीं धरिती विठ्ठलप्रेम । जैसे टाकून स्वनाम । असत्य नाम मैंद घेती ।।५०।। विठ्ठल ज्यांचे कुलदैवत । त्यांनी त्यासी भजणे उचित । ज्यांचे आराध्य उमाकांत । त्यांनी का भजावे अन्यासी? ।।५१।। शिव आणि विष्णू एक । एकाचीच रूपे अनेक । परि साधनी आवश्यक । एकनिष्ठा निश्चये ।।५२।। जो बेल घेऊन सोमवारी । धावत रिघे शिवमंदिरी । आराधीत त्रिपुरारी। ॐ नमः शिवाय म्हणोनी ।।५३।। मंगळवार उजाडता । म्हणे भवानी माझी देवता । गुरुवारी माता पिता । मानी दत्तात्रेयासी ।।५४।। संतोषी माता शुक्रवारी । फुटाण्याच्या फराळ करी । शनिवारी शनीवरी । जातसे तेल घालाया ।।५५।। वारामागे नवा देव । तरी ती भक्ती अवघी वाव । एकनिष्ठा एकमेव । तारी साधकासी निश्चित ।।५६।। म्हणून हरि-हर एक । जरी अंती एकरूप । तरी शिवभक्ते निःशंक । प्रेमे धुर्जटी भजावा ।।५७।। शाक्ते आळवावी शक्ती। गाणपत्याने गणपती। सारस्वताने सरस्वती। आराधावी प्रीतीने ।।५८।। विठ्ठलभक्ते सप्रेम । मुखी घ्यावे हरिनाम । विसरावे देहभान । वाळवंटी नाचता ।।५९।। तैसे शिवभक्ताने स्वभावे। प्रेमे शंकरा भजावे। अन्य दैवती न धरावे । भावप्रेम कदापि ।।६०।। परि महाराष्ट्री ऐसे घडले ।

शिवभक्त शिवासी विसरले । हरिसंकीर्तनी रंगले । वर्जूनि शिवभूषणे ।।६१।। विष्णुभूषणे विष्णुपुराण । हेचि मानती आपुले धन । नाठवे पंचाचार अष्टावरण । रेखिती गंध कपाळी ।।६२।। ऐसे स्वत्व विसरोन । गेले वीरशैव भुलोन । ही बाधा उतरोन । ठेवी ऐसा कोणी नसे ।।६३।। ही ऐसी मंत्रभुली । ज्याने पुढे निवारिली । तो मन्मथ महाराज भूतळी । जन्मेल पुढील अध्यायी ।।६४।। 'मन्मथ आलासे भूलोका । आता कोणी भिऊ नका' । ऐशा फोडिल्या जेणे हाका । त्याची ऐका जन्मकथा ।।६५।। तुम्ही श्रोते विचक्षण । तुमचे करावे समाधान । ऐसे नाही शब्दधन । मजजवळी रसिकहो ।।६६।। ऐकून बाळकाचा शब्द । ग्रीवा तुकावे पिता सानंद । कौतुक करी अब्द अब्द । ते उमटे बाळ-गालावरी ।।६७।। तरी पित्यासारखे साहावे । मज आपुले बाळ म्हणावे । न्यून ते पुरते करून घ्यावे । मोठे करावे मानस ।।६८।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत । भाविकांचे ऋण फेडीत । रचून मन्मथचरित हे ।।६९।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने बाधामुक्त । प्रथमोऽध्याय गोड हा ।।७०।। श्रीशिवार्पणमस्तु ।।



# अध्याय दुसरा

।। श्रीगणेशाय नमः ।। जय जय शिवा सर्वोत्तमा । भक्तकामकल्पद्रुमा । आदिमायेच्या रमणा। जगत्कारणा सर्वेशा ।।१।। उत्पत्ती स्थिती आणि लय । यांचा साक्षी तू स्वयमेव । अवघे ब्रह्मांड शिवमय । तू उपादान जगताचे ।।२।। शक्तीचे करूनि निमित्त । तूचि धरिशी रूपे अनंत। सकल चराचरा चाळवीत । परि सर्वांविगळा तू ।।३।। जळ भरलेले सागरी । त्यावरी नाचती लहरी । लहरी भिन्न भासती परी । त्या अभिन्न सागरासी ।।४।। सिंधू आणि बिंदू । यांचा जैसा संबंधू । तैसा तुझा दीनबंधू । साच संबंधू विश्वासी ।।५।। असो मी प्रवर्तलो येथे । की गावे मन्मथचरित्राते । तरी ग्रंथसिद्धीपुरते । देई सामर्थ्य मजप्रती ।।६।। जेणे महाराष्ट्रप्रांती । लोपलेली शिवभक्ती । जागविली निश्चिती । तो मन्मथ मंहाराज ।।७।। जो शिष्यांचे आश्रयस्थान । वीरशैवांचे बलस्थान । स्वधर्मवंचितांचा स्वाभिमान । ज्याने पुन्हा जागविला ।।८।। त्याचे वानाया चरित्र सुरस । देई सामर्थ्य लेखणीस । भाविक श्रोत्यांचे मानस । आल्हादवी कृपाळा ।।९।। असो दक्ष व्हावे श्रोती । परिसावी कथासंगती । जी परिसता निश्चिती । हरवले स्वत्व सापडे ।।१०।। की आपुला निजठेवा । नेत्रांजने सापडावा । कंठीचा रत्नहार बरवा । जैसा देखावा दर्पणी

।।११।। तैसे या कथेच्या श्रवणे। उघडिती मिटली लोचने। स्व-रूपासी ओळखणे। सहजी मग घडेल ।।१२।। पूर्वाध्यायीचा वृत्तांत। महाराष्ट्री वर्तला आकांत। दुरावला उमाकांत। हृदयांतून शैवांच्या ।।१३।। लोपले इंष्टलिंगधारण। राहिले भस्मविलेपन। विस्मरले शिवकीर्तन। झाले स्वधर्मवंचित ।।१४।। आता काळाची हाकाटी। की अवतरावा धुर्जटी। संचरवावे पोटी। प्रेम पुन्हा शैवांच्या ।।१५।। त्याचा जन्म ज्याच्या घरी। तेथींची काय वानावी थोरी। मराठवाड्या-भीतरी। कळंब नामे ग्राम असे ।।१६।। त्या कळंब नामे ग्रामी। वसती शिवलिंग स्वामी। जे शिवाचारधर्मी। सदा राहती निमग्न ।।१७।। सदा भस्म शोभे भाळी। लिंग विलसे हृदयाजवळी। मुखी शिवनामावळी। कंठी रुळती रुद्राक्षे ।।१८।। चर्या ज्यांची सुप्रसन्न। जे सदाचारसंपन्न। देही जाणवे लक्षण। उत्तम ते पुरुषाचे ।।१९।। नेत्र दोन्ही अति साजिरे। त्यातूनि सर्वदा स्नेह पाझरे। ओठांतली अक्षरे। जणू अमृती चुबकळिली ।।२०।। कोणाचे ना घेणे देणे। आत्मानंदी सदैव रमणे। सद्ग्रंथांची पारायणे। सर्वकाळ चालती ।।२१।। प्रसन्न शांत माहेश्वरमूर्ती। ज्यासी देखता मुरती वृत्ती। परमादरे झुकती। माथी जनांची पदावरी ।।२२।। निनगूर ग्रामीची लेक। पार्वती नामे धन्य एक। की दूजी अंबिकाच देख। ती पर्णिली शिवलिंगे ।।२३।। जिचे वदन देखता सुंदर। लज्जित होई रोहिणीवर। कोमलांगी सुकुमार। पाहता कमळ सकोचे ।।२४।।

तिचे चालणे देखून । राजहंसी जावी लाजून । अंतरी विस्मित घन । कुंतल काळे पाहता ।।२५।। पाहता वर्ण तेजाळ । केतकीच्या मनी जाळ । उमलावे जैसे कमळ । तैसी अंगे विकासली ।।२६।। हरिणीसारखे डोळे । ओठी माधुर्य साठलेले । दशनांवरती सळसळे । विद्युल्लता आभाळीची ।।२७।। विलगताचि अधर । पडे हास्याचे चांदणे टपोर । बिंबाफळ व्हावे रुचिर । तैसे ओठ रसरसले ।।२८।। ऐकता सुस्वर मंजुळ । मनी दचकती कोकीळ । सख्यासमवेत सुशील । शोभे उमेसारखी ।।२९।। आधीच देखणे सुवर्ण । वरी व्हावे गंध-रसपूर्ण । सोनियाचे बरवेपण । कोणी मग वानावे? ।।३०।। तैसे आधीच सुंदरपण । त्यावरी पातले तारुण्य । त्याहीवरी सद्‌गुण । देही तिच्या संचले ।।३१।। ऐसी सौंदर्य-तारुण्य-सद्‌गुणपुतळी । शिवलिंगे नोवरी पर्णिली । शांत शृंगार एकेवेळी । येथे जणू मिळाले ।।३२।। की प्रपंच आणि परमार्थ । येथे झाले एकवट । की भोग आणि योग दुर्घट । येथे जणू मिळाले ।।३३।। अध्यात्म आणि रसिकत्व । तत्त्वज्ञान आणि कवित्व । या दोहोंचे एकरूपत्व । जैसे येथे जहाले ।।३४।। की शिव आणि शक्ती । दोघे एकत्वे रमती । तैसे शिवलिंग-पार्वती । हे दंपती शोभले ।।३५।। परतत्त्व आणि कवित्वशक्ती । या योगे जन्मे कलाकृती । तेवी शिवलिंग-पार्वती- । योगे जन्म मन्मथासी ।।३६।। ते ऐका पुढे चरित्र । जे स्वर्धुनीसारखे पवित्र । जे ऐकता श्रोत्र । धाती भाविक श्रोत्यांचे

।।३७।। पार्वती आणि शिवलिंगस्वामी । गेले निनगूर ग्रामी । तेथे शिवाचारधर्मी । दोघे वर्तती प्रीतीने ।।३८।। नित्यनेमे बिल्वदळी । पूजिती भोळा चंद्रमौळी । ऐसे क्रमता सरली । वर्षे बहुत त्या ठायी ।।३९।। माळेतला मणी । एकेक जावा गळूनी । किंवा वृक्षावरूनी । एकेक पान झडावे ।।४०।। तैसे उभयतांचे आयुष्य । सरत चालले दिवसेंदिवस । परि पार्वतीच्या उदरास । गर्भ काही धरेना ।।४१।। नित्यनेमे वर्षाकाळी । बहरूनि येती वृक्षवेली । वसुंधरा हिरवी बोली । हर्षेकरूनि बोलत ।।४२।। परि सानुल्याच्या पाउली । विस्कटेना अंगणीची रांगोळी । अंतर्यामी झुरे वेल्हाळी । म्हणे ऐसे का व्हावे? ।।४३।। वसुधेवरी फुलती अंकुर । वेलीस येई सुमबहर । धेनूभोवती हंबर । सदा राहत वत्सांचा ।।४४।। वृक्षवृक्षांच्या ढोलींतून । किती पाखरांचे कूजन । मग माझ्याचि उदरालागून । का वांझपण चिकटले? ।।४५।। कोण्या जन्मीचे दुष्कृत । मज आज आडवे येत? । की मी माय-लेकरात । तूट केव्हा घडविली? ।।४६।। किंवा छळिले साधुसंत । की कधी बोलले अनृत। की भरल्या संसारात । विष कोणाच्या कालवले? ।।४७।। माझाचि फुलेना अंकुर । म्हणूनि पार्वती चिंतातुर । सर्वकाळ वाहे नीर । नेत्रांतून घळघळा ।।४८।। शिवलिंग करिती सांत्वन । 'का गे आसवे भरले नयन? । घ्यावे पदरात झेलून। जे प्रारब्धे टाकले ।।४९।। मनाप्रमाणे घडावे । म्हणूनि का नियतीशी भांडावे? । आयुष्य

कडवट करावे । बोल लावूनि नशिबासी?' ।।५०।। स्वामी समजावती परोपरी । परि पार्वती खिन्न अंतरी । एकदा ऐकिले पुराणांतरी । की निपुत्रासी गती नाही ।।५१।। मग नावडे भोजन शयन । सर्वकाळ भरले लोचन । मनी वादळ रिचवून । कालक्रमण करी ती ।।५२।। एक योजन अंतर । क्षेत्र रम्य कपिलधार । तेथे स्वामी दीनोद्धार । मलंगवेषे राहती ।।५३।। नित्यनेमे दर्शनाप्रती । कपिलधारी जाई पार्वती । हळूहळू चित्तवृत्ती । शांत होती तियेच्या ।।५४।। ऐसा क्रमता बहुकाळ । दैवयोगे जाश्वनीळ । घरा यावा ऐसी सुवेळ। तिच्या आली जीवनी ।।५५।। दैवे सापडावा चिंतामणी । की कामधेनू यावी अंगणी । सहज खणता धरणी । हाती यावे ठेवणे ।।५६।। तैसे स्वामी बसवराज । तिच्या घरा आले सहज । जे माणूरमठाधिराज । उभयतांचे सद्‌गुरू ।।५७।। सद्‌गुरूची पडता दृष्टी । होय आनंदजलाची वृष्टी। सद्‌गुरुपदी मिठी । उठाउठी घालती ते ।।५८।। केले गुरुपादपूजन । गुरुपादतीर्थसेवन । प्रसादाच्या वेळी तुष्टून । स्वामी देती आशीर्बाद ।।५९।। 'तुझी पाहून गुरुभक्ती । आम्ही संतोषलो पार्वती । तुझ्या उदरी निश्चिती । स्कंद येईल जननीये' ।।६०।। ऐसा आशीर्वाद देऊन । सद्‌गुरू गेले निघून। पार्वतीच्या मनी गगन । आनंदाचे प्रकाशले ।।६१।। शिवपूजा शिवध्यान । शिवनामस्मरण शिवकीर्तन । बिल्वगंधे सदन । दुमदुमित भरलेसे ।।६२।। दिस काही लोटल्यावरी । गर्भ विरूढला उदरी । आनंद न

माये अंतरी । अपरंपार पार्वतीच्या ।।६३।। जो जो गर्भ वाढे । तो तो शिवपूजा अधिक आवडे। मन नाही प्रपंचाकडे । दृष्टीपुढे शिव उभा ।।६४।। उमलती डोहाळे मनी। की जावे तीर्थालागूनी। किंवा एकांतस्थानी । समाधी लावूनि बैसावे ।।६५।। कधी वाटे डफ हाती । घेऊनि वाजवावा प्रीती । जिंकावे शाहिरांप्रती । गाऊनिया लावणी ।।६६।। हाती लेखणी घेऊन । वाटे करावे ग्रंथलेखन । अनुभवाचा आनंद पूर्ण । करावा कथन श्रोतियां ।।६७।। ज्ञानबोधाच्या सागरी । बुडी द्यावी ये अवसरी । परमरहस्य ग्रंथांतरी । उकलूनिया दावावे ।।६८।। घ्यावा अभंगाचा छंद । शिवकीर्तनी नाचावे स्वच्छंद । स्वधर्मपालनाचा आनंद । जनांलागी सांगावा ।।६९।। कधी वाटे वेडे व्हावे । वेडियाच्या गावा जावे । गुरुलिंगजंगमा भजावे । अत्यादरेकरूनी ।।७०।। ऐशा बहुत परींच्या वृत्ती। मनी भावीतसे पार्वती । स्वामी शिवलिंगाप्रती । भाववृत्ती सांगत ।।७१।। मनी पिता ओळखे । ही दिसती बाळाची कौतुके । सामान्य हा नोहे देखे । दिसे कोणी आगळा ।।७२।। असो भरता नवमास । वेणा येती पार्वतीस । स्वामी शिवलिंगास । घेरलेसे चिंतेने ।।७३।। गर्भगृहाबाहेरून । पाठीसी दो कर बांधून । शिवलिंगांचे भ्रमण । चाललेले अस्वस्थ ।।७४।। बालकाचा रुदनस्वर । ऐकता चिंता पळे दूर । शिवलिंगाचे अंतर । प्रेमे भरले ओतप्रोत ।।७५।। शके चौदाशे ब्याऐंशी । माघ शुद्ध पंचमीसी । सोमवारी द्वितीय प्रहरासी । मन्मथ आला भूलोकी ।।७६।। नारीनर सकळीक।

पाहती बाळाचे श्रीमुख । माय होऊनि सन्मुख । बाळ वोसंगा घेतले ।।७७।। अनिवार फुटला पान्हा। अंकावरी घेऊनि तान्हा । स्तन मुखी देऊनि जाणा । माय प्रेमे पाजीत ।।७८।। भोगीत आईपणाचे सुख । प्रेमे पाहे बाळमुख । चेहऱ्यावरी ओसंडे कौतुक । शब्दांत ते सांगता न ये ।।७९।। कमळापरी टपोर डोळे । मुखावरती वीज खेळे। निमासुर वदन कोवळे । माय न्याहाळी प्रीतीने ।।८०।। मदनासारखा देखणा । अंकावरी खेळे तान्हा । शिवलिंगांच्या नयना । विमलांबुधारा चालल्या ।।८१।। नारी मेळवून सकळीक । पालखा घातले बाळक । 'मन्मथ' ऐसे नाम सुरेख । बालकाचे ठेविले ।।८२।। सुंदर जैसा मदन। म्हणूनि 'मन्मथ' नामकरण । पाळणा प्रेमे हालवून। नारी गेल्या स्वस्थाना ।।८३।। उमलता गंधफूल । रानीवनी दरवळे परिमळ । तैसा पुत्रजन्मे सकळ। आसमंत आनंदला ।।८४।। मन्मथाची जन्मगोठी । वर्णिली मी भाविकांसाठी । राहिली जरी कोठे त्रुटी । पूर्ण करूनि घ्यावी हो ।।८५।। लिंगेश्वरसुत बसवलिंग । तेणे मन्मथजन्माचे अभंग । पंचदश रचिले सांग । त्याच आधारे बोलिलो ।।८६।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत। भाविकांचे ऋण फेडीत । रचून मन्मथचरित हे ।।८७।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने शंकामुक्त । द्वितीयोऽध्याय गोड हा ।।८८।। श्रीशिवार्पणमस्तु ।।



# अध्याय तिसरा

।। श्रीगणेशाय नमः ।। जय जय परात्पर भुजंगा । शिवरूपा भक्तभवभंगा । मन्मथवरदा अभंगा। ब्रह्मानंदा नागेशा ।।१।। तू भक्तांचे निजधन । सज्जनांचे आश्रयस्थान । आर्तांचा प्रकाशकिरण। अधिष्ठान वीरशैवांचे ।।२।। जैसे जळाचेच हिम । परि स्वरूपे दिसे भिन्न । वितळता आपण । जळरूप जहाले ।।३।। की पातळ घृत गोठले । तेचि रूपाकारा आले । तैसे नागेशरूपी संचले । परशिवब्रह्मचि ।।४।। तूचि माणूरमठाधीश । वडवळसिद्ध नागेश । भक्तांसी दावाया प्रकाश । गेला वडवळ ग्रामासी ।।५।। तू शिवयोगी परिपूर्ण । वीरशैवांचे भूषण । संप्रदाय करूनि जतन । झाला संप्रदायातीत ।।६।। मन्मथादी तुझी बालके । तरी अन्य का होती परके? । शैवेतरही सकळीके । तुझी बालके निश्चये ।।७।। ऐसी उदार दृष्टी पूर्ण । संचली तुझ्याठायी जाण । नभासारखे अंतःकरण। तुझे व्यापक दयाळा ।।८।। म्हणूनि उदार नागेशासख्या । तुझी विशाल शिष्यशाखा । अज्ञानसिद्धासारखा। शैवेतर शिष्य होई ।।९।। तुझी होता कृपादृष्टी । मन्मथाची विकासली दृष्टी । मग तेणे साहित्यसृष्टी। मनोहर निर्मिली ।।१०।। मीही रंक तुझा अनाथ । आता पुढे बोलवी ग्रंथ । पाठी असता नागनाथ। मग मज काय उणे? ।।११।। असो द्वितीयाध्याय संपता । मन्मथाची जन्मकथा । आणली श्रवणपथा।

श्रोतियांच्या आदरे ।।१२।। शिवलिंग आणि पार्वती । मनामाजी आनंदती । अति प्रीतीने खेळती । बाळ मन्मथासमवेत ।।१३।। मायपित्याचा संतोष । तो गगनाहूनि विशेष । शब्दापलीकडचा निःशेष। शब्दावाचून_भोगावा ।।१४।। सुकुमार कोवळे अंग । देदीप्यमान गौररंग । जणू अवतरला अनंग । गृही शिवलिंगाच्या ।।१५।। चिद्गगनीचे सुंदर रूपडे । पाहता मन होय वेडे । ऐशा सोलीव सुखापुढे। स्वर्ग बापुडे पै होती ।।१६।। पौर्णिमेचा पूर्णचंद्र । पाहता उचंबळे समुद्र । तैसी मने होऊनि आर्द्र । येई भरते आनंदाचे ।।१७।। दिनोदिन वाढे बाळ । रांगे भोवती सर्वकाळ । कौतुके न्याहाळी वेल्हाळ । मन्मथाची माउली ।।१८।। हळूच भिंत धरून । उभा राहे राजीवनयन । नेत्रांचे पारणे पूर्ण । माय फेडून घेतसे ।।१९।। एकेक टाकता पाऊल । होय मातेचे मन आभाळ । कौतुकाचा परिमळ । सर्वकाळ दरवळे ।।२०।। धरूनि मातेचा पदर । अनुसरे तिला सुकुमार । अंगणीची रांगोळी सुंदर । पदे विस्कटी आपुल्या ।।२१।। मांय करिता शिवपूजन । हळूच पाहे विलोकून । हाती बिल्वदळ घेऊन । वोपी शिवलिंगावरी ।।२२।। त्रिपुंड्र रेखिता माय वेल्हाळ । तोही भरवी आपुले भाळ । भस्म फासे सर्वांगी निर्मळ । कर्पूरगौरासारखे ।।२३।। ऐशा पाहता बाळलीला । धन्यता वाटे माउलीला । अहोरात्र काळ गुंतला । सानुल्याच्या संगोपनी ।।२४।। चंद्रकलेसमान । बालक होय वर्धमान । अष्टवर्षे होता पूर्ण । विचार करिती शिवलिंग ।।२५।। भाळी भस्मविलेपन।

अंगी रुद्राक्षधारण । नित्य इष्टलिंगपूजन । अष्टवर्षांचा बाळ करी ।।२६।। परि गुरूवाचूनि एक । न होय अक्षरांची ओळख । ओलांडावी संसाररेख । गुरुमंत्रबळाने ।।२७।। म्हणूनि गुरुगृही पाठवावे। कुलगुरूहाती निरवावे । तेथ ग्रंथाभ्यास स्वभावे । पुत्र आपला करील ।।२८।। ग्रंथाभ्यासे वाढे बुद्धी। प्राप्त होय विचारसमृद्धी । मग काय कार्यसिद्धी । सहजचि घडेल ।।२९।। ऐसे मनी विचारीत । पार्वतीसी सांगती हृद्‌गत । ऐकूनि माउली चिंताक्रांत । होई पुत्रवियोगाने ।।३०।। मनी झाली व्याकुळ । नेत्रांतून वाहे जळ । म्हणे आता दुरावेल । वत्स माझ्यापासूनी ।।३१।। तिचे काळीज-दुःख जाणून । शिवलिंग करिती सांत्वन । 'होईल सुसंस्कृत पूर्ण । बाळ आपुला निश्चये ।।३२।। याचे दुःख का मानावे? । पुत्रासी सुयश चिंतावे । गुरुगृही पाठवावे । अश्रू आपुले जिरवूनी' ।।३३।। डोळ्यांतील टिपून दुःख । माय झाली हास्यमुख । बाळकासी सुखरूप । जाय म्हणे गुरुगृही ।।३४।। अष्ट वर्षांची सुरेख मूर्ती । शिवलिंगे धरून हाती । निघाले माणुराप्रती । जावयासी सत्वर ।।३५।। पदर मुखावरी धरून । माय पाहे दारातून । पितापुत्र दोघेजण । निघाले अंगणाबाहेरी ।।३६।। मन्मथ पाहे वळून । नयनी माहेर ये दाटून । पुढती पाउले मेळवून । चाले पित्यासंगती ।।३७।। पाउलें तुडविती वाट । मनी मातृप्रेमाचे लोट । ओलावून काजळकाठ । पुढती वाट दिसेना ।।३८।। आपुल्याभोवती सर्वकाळ । जिच्या प्रेमाचा दरवळे परिमळ । जिच्या नजरेचा

परकोट प्रेमळ । रक्षी आपणा सर्वदा ।।३९।। त्या मायेचे अस्तित्वमात्र । आता न जाणवे दिनरात्र । ऐसिया विचारे गात्र । पांगुळती मन्मथाचे ।।४०।। वाट सरली पायातळी । माणूर ग्राम येता जवळी । दुरोनिया विलोकिली । ध्वजपताका मठाची ।।४१।। माणूरमठ पुरातन । रंभापुरी हे मूलस्थान । तेथीचे पट्टसिंहासन । शोभले वीरगोत्राचे ।।४२।। शिवलिंगांच्या चित्ती । आनंदोर्मी उफाळती । गुरुदेवांची कृपा निश्चिती । म्हणूनि पाहिले पुत्रमुख ।।४३।। देखता बसवराज समोर । दंडवत् पडती भूमीवर । मन्मथ करी नमस्कार । सादर गुरुदेवासी ।।४४।। बसवराजे विलोकून । प्रेमे पुसिले वर्तमान । मन्मथाच्या शिरी जाण । कृपाहस्त ठेविला ।।४५।। कथूनि समस्त वृत्तांत । गुरुदेवाहाती निरविला पुत्र । निरोप घेता जडावे चित्त । गेले मागुती स्वस्थाना ।।४६।। मायपित्यासी सदैव । होय मन्मथाचा आठव । त्याच्यावीण शून्य गेह । भासतसे उभयतांसी ।।४७।। असो इकडे माणुरी । धुळपाटी घेऊनि करी । मन्मथ गिरवी कुसरी । एकाग्रचित्ते अक्षरे ।।४८।। शिकला अक्षरलेखन-कला । लागला अक्षरांचा लळा । पठण करीतसे अवलीला । प्राचीन सद्ग्रंथांचे ।।४९।। ऐसे क्रमता दिनोदिन । तो तो वाढे अध्ययन । संस्कृत आणि व्याकरण । झाले अवगत तयासी ।।५०।। अभ्यासली षड्दर्शने । शिव-लिंग-स्कंदादी पुराणे । ब्रह्मसूत्राची पारायणे । केली सहज तयाने ।।५१।। गीता आणि वेदान्त । गीताभाष्य शंकरकृत । द्वैत अद्वैत विशिष्टाद्वैत । मुरवले मनामाजी

।।५२।। नाथ पाशुपत मत । सिद्धान्तशिखामणी ग्रंथ । श्रीकरभाष्य श्रीपतिकृत । मुखोद्गत पै केले ।।५३।। शक्तिविशिष्टाद्वैत । अभ्यासिला षट्स्थलसिद्धान्त । नानापरीची शैव मते । एकाग्रचित्ते अभ्यासली ।।५४।। ऐसे वाढता अध्ययन । मन्मथ होई बुद्धिसंपन्न । विवेकशील संपूर्ण । व्यक्तिमत्त्व जहाले ।।५५।। अध्ययनाच्या प्रभावे । जीवनदृष्टीचा लाभ होय । दृष्टीपुढे उभे राहे । मानवी जीवित समग्र ।।५६।। देखूनि मन्मथाची गती । प्रसन्न झाली गुरुमूर्ती । सहाध्यायांच्या चित्ती । हर्षभाव दाटले ।।५७।। मनी विचारी मन्मथ । आपण अभ्यासिले इतुके ग्रंथ । परि अजूनि नागनाथ । प्रसन्न का होईना? ।।५८।। माणूरमठाचे मूळपुरुष । सद्गुरू श्रीनागेश । का मज पामरास । दर्शन अजूनि न देती? ।।५९।। ऐसे असता चिंतामग्न । बसवराजासी केला प्रश्न । तव ते सांगती हसून । 'ती वाट वेगळी पै ।।६०।। ग्रंथाभ्यास करिता जाण । बुद्धिविकास होय पूर्ण । परि निर्मळ अंतःकरण । होईलचि ऐसे नाही ।।६१।। ग्रंथाभ्यासे होई पढिक । करील आत्मानात्मविवेक । परि कोणाचे देखता दुःख । कळवळेना अंतरी ।।६२।। घडला कोठे मृत्यू जरी । पढिक सांगेल गीता सारी । दुःखिताचे भाव परी । अंतरात ओळखेना ।।६३।। ऐसा पढिक पाषाण । तो स्थितप्रज्ञ नोहे जाण । ती वेगळी वेगळी खूण । ओळखे बा मन्मथा ।।६४।। नागेशाच्या दर्शनास्तव । नको पांडित्याचे वैभव । अंतःकरणी प्रेमभाव । केवळ निर्मळ असावा ।।६५।। सद्गुरूच्या आठवाने । झरू लागावी

दोन्ही नयने । जीवे मने आणि प्राणे । सद्गुरूचि आळवावा ।।६६।। वर्षाकाळी बहरे डोंगर । फुलती कोवळे तृणांकुर । तैसे रोमांच देहावर । फुलावे गुरु-आठवाने ।।६७।। ऐसी निर्मळ भाववृत्ती । जरी दाटेल तुझिया चित्ती । तरीच मन्मथा निश्चिती । दर्शन देईल नागेश' ।।६८।। परिसूनि गुरुवचन । मन्मथासी झाले ज्ञान । बुद्धी आणि अंतःकरण । विकासावे सारखेचि ।।६९।। त्या दिनापासूनि विशेष । मन्मथासी लागला ध्यास । रात्रंदिन नागेश । आठवीत मानसी ।।७०।। जागृती सुषुप्ती स्वप्नी । नागेशचि उभा मनी । भोजनी आसनी ग्रंथाध्ययनी । नागेशचि आठवीत ।।७१।। ग्रंथातील अक्षर । दिसे नागेशरूपाकार । बसवराज येता समोर । भासे आला नागेश ।।७२।। नागेशाने सर्व व्यापिले । मन्मथासी ध्यान लागले । भोवती सर्वत्र संचले । रूप गुरू नागेशाचे ।।७३।। विश्वाएवढे आर्त । मनामाजी प्रकाशत । अंतःकरणवृत्ती डोलत । नागेशनामी सर्वदा ।।७४।। सागरातील लवण। सागरी जावे विरून । तेवी नागेशमय जाण । मन्मथ स्वये जहाला ।।७५।। एकवटता चित्तवृत्ती । पुढे प्रकटली श्रीगुरुमूर्ती । मन्मथाची नयने पाती । हालवूचि विसरली ।।७६।। तेजःपुंज गौर कांती । जणू भानुबिंबे प्रकटती । वक्षःस्थळावरती । शुभ्र दाढी रुळतसे ।।७७।। भाळी त्रिपुंड्र रेखिला । रुद्राक्षमाळा विलसती गळा । कर्पूरगौरचि दूजा शोभला । ऐसा अंगी भस्मलेप ।।७८।। कमळावरी पडावा थेंब । तैसे दो नयनीचे बिंब । कृपाजळे झाला चिंब । अंतर्बाह्य मन्मथ ।।७९।।

नेत्री वाहे आनंदजळ । चित्ती उसळती भावकल्लोळ । जैसी येता चंद्रवेळ । उसळे जळ सागराचे ।।८०।। होऊनिया सद्गदित । केला साष्टांग प्रणिपात । जैसा शैल अंकुरत । तैसे रोमांच तनूवरी ।।८१।। तेथे शब्द मावळले । अष्टभाव हृदयी दाटले । पाहता पाहणे हरपले । द्वैतभाव निमाला ।।८२।। ऐसा जाता बहुकाळ । भानावरी ये पार्वती-बाळ । नेत्र उघडिता जवळ । दुजे कोणी दिसेना ।।८३।। येऊनि बसवराजासमोर । दंडवत् पडे भूमीवर । पाहता त्यांच्या मुखावर । गूढ हास्य विलसले ।।८४।। गूढ अंतरीची खूण । ते जाणती दोघेजण । इतर जनांलागून । अणुमात्र कळेना ।।८५।। शिव तोचि नागेश्वर । येथे अन्य नाही विचार । नागेशाच्या सिंहासनावर । विराजमान बसवराज ।।८६।। म्हणूनि बसवराजाठायी । नागेशचि संचला अक्षयी । मन्मथाच्या हृदयी । हे ज्ञान प्रकाशले ।।८७।। ऐसे ज्ञानसंपन्न होता । नमूनिया श्रीगुरुनाथा । म्हणे 'गृहासी जावया आता । आज्ञा मज देईजे' ।।८८।। मन्मथाची जडणघडण । निरूपिली तुम्हालागून । एकचित्ते करावी श्रवण । पुढील कथा श्रोतेहो ।।९०।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत । भाविकांचे ऋण फेडीत । रचूनि मन्मथचरित हे ।।९१।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने चिंतामुक्त । तृतीयोऽध्याय गोड हा ।।९२।। श्रीशिवार्पणमस्तु ।।



# अध्याय चौथा

।। श्रीगणेशाय नमः।। रेणुक दारुक एकोराम । पंडित विश्वाराध्य जाण । या पंचाचार्यांसी नमन। माझे सदा असावे ।।१।। शिव जितुका पुरातन । तितुका शिवाचार प्राचीन । केले वीरशैवधर्माचे स्थापन । पाच आचार्ये युगी युगी ।।२।। कल्याणीचे बसवेश्वर । त्यांनी केला विस्तार । कालोचित समाजविचार । जोडला वीरशैवधर्मासी ।।३।। इष्टलिंग पूजा करिता । परशिवब्रह्म येई हाता । प्रेमबहळ भक्ता । जोडे आयता मोक्षचि ।।४।। परि इहलोकी राहावे लागे । जुळती माणसांशी धागे। म्हणूनि इहजीवन अनुरागे । सदैव भरले असावे ।।५।। देह आणि नात्यासहित । आपण समाजाचा अंश सत्य । म्हणूनि समाजाभिमुख चित्त । असावे शिवशरणाचे ।।६।। ऐसा हा समाजविचार । धर्मासी जोडे बसवेश्वर । कष्ट करूनि भाकर । मिळवावी आपुली ।।७।। ऐहिक आणि पारलौकिक । दोन्ही जीवने असावी सुरेख । सदाचार विस्मरता देख । तोचि नरक प्राणियासी ।।८।। इष्टलिंग धारण करिता । जागी असावी मानवता। अंतर्बाह्य शुचिता । बसवाने पुरस्कारिली ।।९।। पंचाचार्य बसवेश्वर । या सर्व विभूती थोर । येथे निंदेसी अवसर । अणुमात्र नसावा ।।१०।। पंचाचार्य पाच जण । वीरशैवधर्मनदीचा उगम । बसवेश्वर तिचे वळण । ऐसे मनी भाविजे ।।११।।

असो धर्म आचार्यप्रणित । महाराष्ट्री झाला प्रतिष्ठित । त्यावरी मळभ येता सत्य । वारिले मन्मथवीराने ।।१२।। त्या मन्मथाची गोड कथा । परिसावी श्रोत्यांनी आता । सावध करूनि चित्ता । व्हावे सादर श्रवणासी ।।१३।। मागील अध्यायी वृत्तांत । नागेशभेटीचा पुरून हेत । झाला कृतार्थ मन्मथ । सर्व भरून पावला ।।१४।। मग गुर्वाज्ञा घेऊन । मायपित्याच्या भेटीलागून । निनगूर ग्रामासी जाण । जावयासी निघाला ।।१५।। पायातळी सरता वाट । ओलावती काजळकाठ । कितीक संवत्सरांनी गाठ । पडे आपुल्या मायेची ।।१६।। उगवला सूर्य कितीवेळ । कितीदा अवस-पुनवेचा खेळ । कितीदा भरून आले आभाळ । तेही आता नाठवे ।।१७।। प्रिय पुत्राच्या वियोगे । तिच्या क्षणांची झाली युगे । मनामनाचे धागे । न तुटती जन्मांतरी ।।१८।। ज्यांच्या दृष्टीत स्नेहाळ । उजळे पुत्रभविष्य निखळ । ते तातही व्याकुळ । किती झाले असतील? ।।१९।। ऐसा करिता विचार । जवळी आले निनगूर । अंगणात सुकुमार । पाय ठेवी मन्मथ ।।२०।। तो देखे ओसरीवरी । शून्यदृष्टीने पाहात वरी । जननी बैसलो अंतरी । रूप पुत्राचे आठवीत ।।२१।। 'माय' ऐसी फोडूनि हाक । धावे पार्वतीचा बालक । तिला बिलगता देख । गजबज मनी दाटली ।।२२।। तेजःपुंज सुकुमार । तारुण्य प्रकटले अंगभर । हा कोण क्षणभर । विचलितचित्त जहाली ।।२३।। परि पटल्या अंतरखुणा । ओळखे हाचि आपुला तान्हा । यासी अंकावरी घेऊनि पान्हा । आपण प्रेमे पाजला ।।२४।। तोचि हा

कोवळा बाळ । एका तपाचा लोटता काळ । आता सुदृढ केवळ । दिसे कोणी आगळा ।।२५।। पुत्रासी मिठी घालून । माय रडे स्फुंदस्फुंदून । पूर येई सरितेलागून । तैसे अश्रू वाहती ।।२६।। शिवलिंग सदनी येऊन । पुत्रासी देती आलिंगन । कृतार्थतेने अंतःकरण । भरून आले स्वामींचे ।।२७।। असो असावे आनंदभुवन । तैसे झाले त्यांचे सदन । शास्त्रचर्चा पुराण-श्रवण । यात रंगले समस्त ।।२८।। प्रसन्न माता सरस्वती । मन्मथास होई स्फूर्ती । अंतरी भावोर्मी उफाळती । परि निर्मिती होईना ।।२९।। वाटे असे काही लिहावे । जे रसिकांनी गौरवावे । कवित्वशक्ती पाहून व्हावे । चकित समस्त लोकांनी ।।३०।। अलंकाराचे पायी पैंजण । शृंगाराची चंद्रकळा नेसून । कवितारतीने नर्तन । लोकरंजना करावे ।।३१।। शास्त्रप्रवीण मन्मथ । परि अंतरी अस्वस्थ । मनातला गुह्यार्थ । शब्दांतून प्रकटेना ।।३२।। डफावरी पडता थाप । कवाडे उघडली आपोआप । लावणीचे घेऊनि रूप । शारदा उभी सामोरी ।।३३।। मन्मथाचे भिजले मन । सापडे आतले शब्दधन । शब्दांची घुंगरे बांधून । नृत्य करी कविता ।।३४।। शब्दांची रूपे अनंत । स्पर्शरसगंध-युक्त । त्या मोहमय जालात । मन्मथ गुंतत दिनरात्र ।।३५।। लावण्यवती लावणी । सर्वकाळ त्याच्या मनी । भ्रमवी मन्मथालागूनी । ग्रामे नगरे सर्वत्र ।।३६।। डफाचा वाढला ताल । मन्मथाचा ढळला तोल । कवी म्हणूनि सकळ । रसिकमान्य जहाला ।।३७।। शाहिरांशी जिंकले किती । नाही

तयांची गणती । मनी भरली कवितारती । लावण्यवती तयाच्या ।।३८।। मातापिता दोघेजण । व्यथित मनी रात्रंदिन । म्हणती इतका बुद्धिसंपन्न । पुत्र कैसा वाहवला? ।।३९।। गुरुगृहीचे अध्ययन । धूसर कैसे झाले जाण । विवेकाचा मेरू पूर्ण । वळीव-सरीत विरघळे ।।४०।। कोठे शास्त्रांचा अभ्यास । कोठे लावणीचा ध्यास । निर्मळ गंगाप्रवाहास। ओहळ मलिन मिळाला ।।४१।। असो मन्मथाची कीर्ती । कर्णोपकर्णी माणुराप्रती । परिसता बसवराजांच्या चित्ती । विषादभाव दाटला ।।४२।। दूर सारिता विषाद । अंतरी दृढावला बोध । की मन्मथ नोहे दोषास्पद । नाव ठेवणे व्यर्थचि ।।४३।। चित्त त्याचे सृजनशील । सहानुभवाने पाझरेल । जैसे रविकिरणी शीतल । हिम निर्मळ वितुळे ।।४४।। हृदयीचे भावलोट । जी सामोरी दिसली वाट । तिकडे चालले बोभाट । आवरिता नावरती ।।४५।। जैसे पाऊसकाळीचे खळाळ। दिशाहीन होऊन केवळ । फुगूनि धावती सकळ । मिळेल त्या वाटांनी ।।४६।। परि सरितेचे वाहणे संथ । तिचा सुनिश्चित असे पंथ । तैसी भावोर्मीसी निश्चित । दिशा लागे सापडावी ।।४७।। म्हणूनि मन्मथासी पाचारावे । धर्मकार्यासी आज्ञापावे । त्याच्या भावोर्मीस द्यावे । अधिष्ठान धर्माचे ।।४८।। ऐसा हेतू मनी धरून । मन्मथासी केले पाचारण । उभा दोन्ही कर जोडून । स्वामीपुढे राहिला ।।४९।। म्हणे 'गुरुदेवा किमर्थ । पाचारिले दासाप्रत? । आपुल्या मनीचा हेत । प्रांजळपणे सांगावा' ।।५०।। प्रेमपूर्वक हसून । बैसावया दिधले

आसन । म्हणती 'मन्मथा तू पूर्ण । ज्ञाता षट्शास्त्रांचा ।।५१।। तू झालासी शाहीर । आले आमुच्या कानावर । तुझी लावणी मधुर । श्रोतयां मंत्रमुग्ध करी ।।५२।। शब्द लाघवी अत्यंत । अर्थातून अर्थ प्रसवत । उठती संथ जलाशयात । जैसी जलवर्तुळे ।।५३।। समुद्राहूनि सखोल । ऐसा शब्द विशाल । शृंगारवर्णनी केवळ । का व्यर्थ वेचावा? ।।५४।। स्त्रीदेह अतिसुंदर । तिचा मोह अनिवार । शब्दांचे कितीक तुषार । स्त्रीदेहावरी उधळले ।।५५।। सुंदर देहापलीकडे । काय सुंदर मन सापडे? । नसता व्यर्थ बुडबुडे । उरती शब्दखेळाचे ।।५६।। त्वचेवरली नव्हाळी । ओघळे आयुष्याच्या संध्याकाळी । त्वचा जितुकी देहावरली । तितुकी खोल सुंदरता ।।५७।। ऐसिया देहाच्या वर्णनी । कशास झिजवावी लेखणी? । शाश्वताच्या निरूपणी । शब्द आपुले वेचावे ।।५८।। देहाहूनि अधिक सुंदर । शाश्वत चैतन्य निरंतर । त्यासी जागविण्यासी मधुर । शब्द आपुले वेचावे ।।५९।। सुखदुःखाच्या संसारकथा । आदिकालापासून वाहत्या । त्यांचे चर्वण करण्याकरिता । शब्द कशास वेचावे? ।।६०।। तू सकळ शास्त्रांचा ज्ञाता । वरी प्रसन्न शारदामाता । म्हणूनि तुझी लेखणी आता । झिजावी धर्मकारणी' ।।६१।। ऐसे बहुतापरी बोधून । मन्मथाचे वळविले मन । प्रकाशले हृदयी ज्ञान । सदगुरूच्या उपदेशे ।।६२।। पदी ठेवूनिया माथा । म्हणे 'तारिले गुरुनाथा। प्रवाहातूनि वाहात असता । किनाऱ्यावरी आणिले ।।६३।। मुळी शब्दभुली अनिवार। त्यात रसराज

शृंगार । लावण्यमद त्याहीवर । म्हणून तेथे वाहवलो ।।६४।। आता आपुला शब्द प्रमाण । तेचि माझे निजधन । याउपरी वेचीन । शब्द धर्मकारणी' ।।६५।। संतोषूनि गुरुनाथे । आलिंगिले मन्मथाते । म्हणती 'भरूनि पावलो पुरते । तुजसमान शिष्य केला ।।६६।। तुझी मूळ कविवृत्ती । आणिक धर्माभ्यासी गती । यायोगे महाराष्ट्रप्रांती । शिवाचार उजळेल' ।।६७।। कृपणे जपावे ठेवणे । की पतिव्रतेने सौभाग्यलेणे । तैसी हृदयी गुरुवचने । जपून ठेवी मन्मथ ।।६८।। गुरुगृहाचा आश्रय घेऊन । ग्रंथाभ्यासी झाला मग्न । पाझरू लागे अंतःकरण । शब्द भिजून उमटती ।।६९।। लावणीची रचना सारी । विस्मरून गेला अंतरी । आता अभंग ओठावरी। येई सोज्वळ स्वरूपी ।।७०।। विस्मरला डफाची थाप । आता होऊन अंतर्मुख । अनाहतनादाचे अनेक । गुंतला ताल ऐकाया ।।७१।। शाहिराचा झाला संत । कविप्रवृत्ती उरली मात्र । आत्माविष्कारासी उचित । वाट दाविली गुरुनाथे ।।७२।। हृदयामधले आर्त । होई अभंगी प्रतिबिंबित । शिवदर्शनासी आतुर चित्त । सर्वकाळ तगमगे ।।७३।। केली विषय-चोरांनी नागवण। जन्मफेऱ्यांचा आला शीण । म्हणूनि महादेवा शरण । तुजप्रती मी आलो ।।७४।। आता शंभु महादेवा । देवा पार्वतीच्या धवा । माझ्या जीवीचिया जीवा । वेगी मज पावावे ।।७५।। आले आले संकट पाही । बुडालो प्रपंचाच्या डोही । काढी धरूनिया बाही । बाहेरी मज सर्वेशा ।।७६।। तू अनाथांचा नाथ । भक्तांचा कैवारी सत्य ।

ऐसी तुझी पुराणांत । थोरी असे वानिली ।।७७।। सिद्ध करी थोरपण । ते नोहे माझे काम । हाती धरी वा दे सोडून । मज त्याचे काय बा? ।।७८।। अभक्तांच्या भयापोटी । तू दडलासी जगजेठी । तरी आता भक्तासाठी । प्रकटावे दयाळा ।।७९।। तुझ्यासाठी वेडा झालो । वेडियाच्या गावा गेलो। तेथे आपणा विसरलो । सामावलो तुझ्या रूपी ।।८०।। मन्मथांच्या अभंगांतून । होतसे आत्माविष्करण। शिवदर्शनाने धन्य । जीवन त्यांचे जहाले ।।८१।। जैसा फुलाचा परिमळ । वाऱ्यासंगती अळुमाळ । आसमंती दरवळे सकळ। सुगंध पेरीत मानसी ।।८२।। तैसे मन्मथस्वामीचे नाम । अभिमंत्रित लोकांचे कान । ख्याती पावले उत्तम । महाराष्ट्राभीतरी ।।८३।। मन्मथांची अभंगवाणी । ऐकत्याच्या अंतःकरणी । करीत सद्भावांची पेरणी । जिव्हेवरी नाचतसे ।।८४।। शिवप्रेमाने बहळ । मन्मथस्वामींचे मन प्रेमळ । अभंगांतूनि निर्मळ । अति नितळ उमटले ।।८५।। जैसे संथ जलाशयात । आकाश व्हावे प्रतिबिंबित । किंवा शुद्ध दर्पणात । उमटावे स्वरूप ।।८६।। साधकदशेपासून । आत्मप्रचीतीपर्यंत जाण । मन्मथाचा विकास पूर्ण । अभंगांतून जाणवे ।।८७।। झटकूनि विकार-काजळ । आत्मज्योत तेवे निर्मळ । शाहिरीचा लेप समूळ । धुऊनि टाकला मन्मथे ।।८८।। कळीचे होऊन फूल । दरवळावे अंतराळ । सुगंध पेरणे सर्वकाळ । हेचि इतिकर्तव्यता ।।८९।। जगासी द्यावा प्रकाश । हाचि सूर्याचा जीवनध्यास । शांत करावे तृषार्तास । हेचि जगणे नदीचे ।।९०।। चंदनाचे झिजणे । तेचि लोकांसी

सुख देणे । तैसी संतांची जीवने । सुखदायक जगासी ।।९१।। उंचावरूनि खाली धाव । ऐसा पाण्याचा स्वभाव । न पेरिताही स्वयमेव । तृण माजती भूमीवरी ।।९२।। तैसे ऐहिक सुखाकडे । जनमानस धावे वेडे । अमानुषतेचे वेढे । पडती मनाभोवती ।।९३।। विसरूनि माणूसपण । देहभोग मानूनि धन । अमानवी वर्तन । घडे लोकांहातूनि ।।९४।। ऐशा लोकस्वभावाप्रती । संत सायासे मुरडिती । माणुसकीची देती । अभंगांतून शिकवण ।।९५।। माणसांशी घडविणे । हेचि संताचे जिणे । आयुष्य उधळूनि देणे । जीवनध्येयाकरिता ।।९६।। इष्टलिंग घेऊनि हाती । जो पूजा करी नदीकाठी । बुडत्याची हाकाटी । ऐकूनि पूजा सोडेना ।।९७।। जो न वाचवी जीव । तो नोहे वीरशैव । देहातला मानव । धर्म जागा करीतसे ।।९८।। पाळी धर्माचार अनेक । परि माणुसकी विसरला एक । तो कदापि नोहे धार्मिक । शुद्ध दांभिक जाणावा ।।९९।। मग भस्माने भरूनि भाळ । शिवालयी बैसला कुटीत टाळ । रुद्राक्षांची माळ । मिरवी गळा घालूनी ।।१००।। 'शिव शिव' म्हणे अहोरात्र । तरी प्राप्त नोहे त्रिनेत्र । ऐसियाचे मन फुटके पात्र । त्यात काही राहिना ।।१०१।। म्हणूनि माणूसप्रधान धर्म । तोचि प्राणियांसी उत्तम । मन्मथस्वामींनी 'परम' । हेचि 'रहस्य' जाणले ।।१०२।। अभंगांतूनि ठायी ठायी । विचारमौक्तिके विखुरली पाही । स्वधर्मबांधवांसीही । दाखविला सन्मार्ग ।।१०३।। अभक्त आणि स्वधर्मवंचित । तयांसी वाक्ताडन करीत । शिवभक्तांची

मने फुलवीत । वाहे गंगा अभंगाची ।।१०४।। शिवभक्तांच्या कुळी जन्मून । जो तुळसीमाळ करी धारण । ऐशा व्यभिचारियांसी जाण । वाक्ताडन अभंगी ।।१०५।। एकनिष्ठा झाली क्षीण । धर्मांतर ठरला गुण । ऐशा काळी अभंगांतून । निष्ठा मन्मथे जागविली ।।१०६।। जैसा येता पाऊसकाळ । चहुकडे धावती ओहळ। तैसे वीरशैव रानोमाळ । नुमजूनि धावती ।।१०७।। जन्म घेतला ज्या कुळी । त्याची करूनि राखरांगोळी । दुजिया कुळाची भाळी । घेती ठोकूनि तप्तमुद्रा ।।१०८।। पित्याचे नाव टाकावे । दुजियासी बाप म्हणावे । या वृत्तीस स्वभावे । विरोध करिती मन्मथ ।।१०९।। जो छंद विठ्ठलनामी । तोचि जागतो शिवनामी । जी धुंदी हरिकीर्तनी । ती शिवकीर्तनी उतू जाय ।।११०।। गळ्यातील तुळसीमाळ । जी निष्ठा जागवी प्रबळ । तीच निष्ठा रुद्राक्षमाळ । गळा घालता जागवी ।।१११।। गोपीचंदनाचा टिळा । फुलवी स्पर्शसुखाचा मळा । त्रिपुंड्र रेखिता भाळा । तोचि येई अनुभव ।।११२।। हरिदासांच्या अभंगांत । भक्तिगंगा वाहे मुक्त। तीच वाहे सदोदित । हरदासांच्या अभंगी ।।११३।। जवळी असता कस्तुरी । मृग उधळती वनांतरी। शोधशोधूनि बहुतापरी । व्यर्थ होती कष्टी पै ।।११४।। ऐसे असे वेडेपण । काय मिळे धर्म त्यागून?। श्रीकृष्णही गीतेतून । स्वधर्मनिष्ठा सांगती ।।११५।। मन्मथांची अभंगवाणी । चुकलेल्यासी मार्गी आणी । जे गेले धर्म त्यागूनी । ते स्वधर्मी पुन्हा येती ।।११६।। मार्ग चुकला दिवसभरी । परि रात्री येई घरी । तैसी धर्मभ्रष्टांची परी । महाराष्ट्री जहाली ।।११७।। शिवनामाचा घोष । अंतराळी घुमे

विशेष । शिवकीर्तनी शिवदास । आनंदविभोर नाचती ।।११८।। शिवभजन शिवपूजन । शिवनामस्मरण संकीर्तन । शिवभक्तीचे जागरण । मनामनांतून जहाले ।।११९।। वीरशैव-धर्मधारा क्षीण । ती पुन्हा झाली बलवान । मन्मथस्वामींचे नाम । सर्वतोमुखी जहाले ।।१२०।। संतोषूनि गुरुमूर्ती । मन्मथस्वामीसी आज्ञापिती । की 'जनसामान्यांप्रती । धर्मतत्त्वे निरूपावी ।।१२१।। तू अभंगलेखन केले । ते बहुतांसी मानवले । शिवभजना रूढविले । आले माझ्या मनासी ।।१२२।। पृथक् पृथक् भाववृत्ती । अभंगांतूनि अवतरती । परि तत्त्वनिरूपणी निश्चिती । सलगता असावी ।।१२३।। देववाणी संस्कृतात । विवरिला शिवसिद्धान्त । तो मराठी जनांप्रत । कैसा कळावा या काळी? ।।१२४।। म्हणूनि सांगे माझे मन । की तू करावे ग्रंथलेखन । धर्मतत्त्वे सामान्यांलागून । मराठीतून निरूपावी' ।।१२५।। परिसूनि गुरुवचन । मन्मथाचे आनंदले मन । सादर दोन्ही कर जोडून । म्हणे 'ऐसेचि घडेल ।।१२६।। आपुला कृपाहस्त माथा । मग मजसी कैसी व्यथा? । तुमचे तुम्ही बोलवा ग्रंथा । मी केवळ निमित्तमात्र' ।।१२७।। सकलशास्त्रपारंगत । मन्मथस्वामी कृपावंत । ग्रंथरचना रसयुक्त । आता पुढे करतील ।।१२८।। ती कथा रसपूर्ण । भाविकांनी करावी श्रवण । स्व-रूपासी ओळखून । आपुले आपण असावे ।।१२९।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत। भाविकांचे ऋण फेडीत । रचून मन्मथचरित हे ।।१३०।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने श्रद्धायुक्त । चतुर्थोऽध्याय गोड हा ।।१३१।। श्रीशिवार्पणमस्तु ।।

# अध्याय पाचवा

।। श्रीगणेशाय नमः।। जय जय स्वामी पलसिद्धा । शिवयोगी ज्ञानवृद्धा । षट्स्थलब्रह्मा प्रबुद्धा । खेटकवनवासिया ।।१।। पळसफुले रक्तरंगी । वर्षती तुझिया सर्वांगी । चित्त रंगले आत्मरंगी । गुरुराया सर्वदा ।।२।। संथपणे डोले वेल । तैसा देह डोले कोमल । समाधिसुखाचे कल्लोळ । उठती तुझ्या अंतर्यामी ।।३।। दक्षिणेकडून उत्तरेसी । भ्रमण केले देशोदेशी । नरकेसरीस काश्मीरदेशी । दिधले तू संजीवन ।।४।। वृक्षवेलीस देत नीर । तृषार्तांचे शांतवीत अंतर । खळखळ वाहे निर्झर । तैसा तू सुखदायक ।।५।। बोधूनि षट्स्थलसिद्धान्त । रूढविला वीरशैव पंथ । धर्म हीच जीवनरीत। जनसामान्या शिकविली ।।६।। प्रणितेतीरी खेटकवनी । समाधी घेतली संजीवनी । पलाशतरू अजूनी। साक्ष देत उभा असे ।।७।। माझे अंतरीचा हेत । की पूर्ण व्हावे चरितामृत । तू होऊन साह्यभूत । मनोरथ पूर्ण करी ।।८।। तू जरी नाही म्हणावे । तरी मी कोणा हाकारावे? । तरूने पांथस्था दवडावे । मग छाया उरे केवी? ।।९।। नदी नाकारी तृषिता । त्याचा कैवारी कोण आता। रागेजली जरी माता । मग बाळ कैसा वाचे? ।।१०।। आता द्यावे कृपादान । पूर्ण करावे ग्रंथलेखन। जैसा आष्टीचा लक्ष्मण । लिहिता केला मायेने ।।११।। असो पूर्वाध्यायी अनुसंधान । मन्मथांनी अभंग रचून । वीरशैवांच्या मनांतून । शिवभक्ती जागविली ।।१२।। संतोषूनि बसवराय।

आज्ञापिती ग्रंथकार्य । मन्मथांनी शिरोधार्य । गुर्वाज्ञा मानिली ।।१३।। वाट चुकले वीरशैवजन । नेणती आचार तत्त्वज्ञान । त्यांना सिद्धान्त बोधून । स्वत्वाची देणे जाणीव ।।१४।। यालागी ग्रंथार्थ। मन्मथांनी आदरिला येथ । लाभला लेखनसाह्यार्थ । आशीर्वाद श्रीगुरूचा ।।१५।। करावया लेखनकामाठी। आधी अक्षरे घटवून गोमटी । मग सिद्ध लेखनासाठी । जैसा होय लेखक ।।१६।। तैसे 'परमरहस्य' संस्कृत । ते सामान्यास्तव करणे प्राकृत । त्या आधी लेखन निश्चित । सरावार्थ करावे ।।१७।। म्हणूनि 'गुरुगीता' गीर्वाण । त्यावरी प्राकृत टीकालेखन । मन्मथांनी संतोषून । आरंभिले आदरे ।।१८।। जो ज्ञानाचा महोदधी । अनुभवदाता उदारबुद्धी । ऐशा गुरुरायाचे आधी । प्रेमे स्तवन करावे ।।१९।। म्हणूनि पहिले काव्यफूल । 'श्रीगुरुगीता' हे निर्मल । मन्मथस्वामींनी कोमल । अर्पिले गुरुचरणावरी ।।२०।। गुरुभक्तीने ओसंडून । वाहे मन्मथांचे अंतःकरण । तेचि गुरुगीतेतून । अति नितळ उमटले ।।२१।। आकाशीची चंद्रकोर । बिंबे जलाशयी स्थिर । किंवा दर्पणी मनोहर । रूप आपुले स्थिरावे ।।२२।। तैसे मनीचे गुरुप्रेम । घेऊनि शब्दांचे माध्यम । ग्रंथातूनि मनोरम । उमटले अवधारा ।।२३।। फुलामाजी परिमळ । चंद्रामाजी तेज निखळ । तैसे मन्मथमनी बहळ । गुरुप्रेम दाटले ।।२४।। असो वर्णित श्रीगुरूचे रूप । रूपा आणीत त्याचा प्रताप । गुरुगीता-टीका सुरूप । सिद्ध झाली सहज ।।२५।। ती टीका करिता श्रवण । आनंदले श्रीगुरूंचे मन । म्हणती 'बा रे आता लेखन । शिवसिद्धान्तावरी करावे' ।।२६।। 'जी जी' वदूनि मन्मथस्वामी । हर्षभरित अंतर्यामी ।

शिवगणा प्रमथा वंदूनी । रचनेलागी प्रवर्तले ।।२७।। सिद्धान्त आणि आचार । ज्यात एकवटले मनोहर । त्या 'परमरहस्या'वरी मधुर । आरंभिले भाष्य पै ।।२८।। करूनि गुरुगीतेचे कवित्व । संपादिले ओवीवर प्रभुत्व । आता शिवभक्तांचे स्वत्व । ओवीबद्ध करावे ।।२९।। गुरुदेवासी नमून। आदरिले ग्रंथलेखन । ओवीमागे ओवी धावून । अर्थ लागे प्रसवू ।।३०।। उगवीत पेरातूनि पेर । उसाचा होय विस्तार । तैसी ओवीतून ओवी रुचिर । उगवीत ग्रंथ विस्तारला ।।३१।। मिटलेले कमलफूल । उमलावे एकेक दल । तैसे परमरहस्य सखोल । शब्दांतून उमलले ।।३२।। शिवगौरीचा संवाद । मनी पेरीत ब्रह्मानंद । वाहत चालला स्वच्छंद । शिवतत्त्वांकुर रुजवीत ।।३३।। श्रोते साक्षात् शिवगण । सत्यवादी कृपाळू पूर्ण । त्यांचे तोषीत अंतःकरण । ग्रंथ पुढे चालला ।।३४।। ते सुखरूप असती आनंदे । जडजीव तरती त्यांच्या प्रसादे । मन्मथाकडून स्वानंदे । टीका घेती करवून ।।३५।। भुक्ती-मुक्ती ज्ञान-विज्ञान । यांचे स्वरूप विवरले पूर्ण । त्यांचा दाता आनंदघन । तो श्रीगुरू वर्णिला ।।३६।। त्यांचे पवित्र पादतीर्थ । सेवूनि मुक्त गुरुभक्त । लिंगनिष्ठ ज्ञानयुक्त । तो खरा वीरशैव ।।३७।। इष्टलिंग त्याचा प्राण । ते हरपता तो प्रेतासमान । किंवा विधवा भ्रतारावीण । जैसे कंठी आयुष्य ।।३८।। तैसा होऊनि सैरभैर । पिशाचवत् विचरे महीवर । ऐसा दृढ लिंगाचार । ज्याच्या अंगी बाणला ।।३९।। इष्टलिंग स्थूल नोहे । ऐसे मनी ज्ञान वाहे । लिंगी परशिवासी पाहे । आपुल्या अंतःचक्षूंनी ।।४०।। हृदयप्रदेशी सदैव । लिंग वाहे वीरशैव । भक्त आणि शिव । तेथे मध्यस्थ

कशाला? ।।४१।। म्हणूनि राउळीचा देव । हृदयावरी बांधूनि शैव । बडवे पुजारी पुरोहित सर्व । दूर लोटी जाणूनी ।।४२।। वाहायासी बिल्वपत्र । येथे पुजारी नोहे पात्र । पूजापाठाचे मंत्र । म्हणाया पुरोहित लागेना ।।४३।। ऐसा देवळातला मध्यस्थ । दूर करूनि शास्त्रपूत । ईश्वर आणि भक्त । ज्याने एकत्र आणिले ।।४४।। शैवलक्षणे देहावरी । विराजती परोपरी । नेत्रांतूनि वाहे झरी । अखंड समत्वभावाची ।।४५।। अग्नीमाजी जळता काष्ठ । तेथे काय उरे विशिष्ट? । बाभूळ चंदन होऊनि नष्ट । उरे केवळ अग्निरूप ।।४६।। बाभळीचे बाभूळपण । आणि चंदनाचे चंदनपण । नुरता दोन्ही समान । होती एक वन्हिरूप ।।४७।। तैसा शिवसंस्कार होता । जातिभेद होय सरता । ब्राह्मणशूद्रादी भेद आता । शिवस्वरूपी विलीनले ।।४८।। कोण ब्राह्मण कोण शूद्र?। मावळूनि सारे भेद अभद्र। शिवरूप केवळ भद्र । विश्वव्यापी संचले ।।४९।। ऐसे निखळ उरे ज्ञान । आणि तैसे होय वर्तन । समत्वबुद्धीचे दृश्य लक्षण । इष्टलिंगा मानीतसे ।।५०।। तो वीरशैव आचारशील । बुडत्याशी हात देईल । आंधळ्याशी मार्ग दावील । कृपा करील जगावरी ।।५१।। शिवस्मरण शिवकीर्तन । यात मानी समाधान । जगावरी मायेची पूर्ण । पाखर सदा घालीतसे ।।५२।। आपुल्यामागे येती लोक । म्हणूनि आचार ठेवी चोख । वडिलासारखे वर्ते बालक । म्हणूनि क्रिया न सांडी ।।५३।। अहंता आणि दांभिकता । त्याच्या मुळी न स्पर्शे चित्ता । केवळ लोकहिताकरिता । त्याचे जगणे उरलेसे ।।५४।। आपुले आयुष्य-भांडे जाण । ते कशाने भरावे पूर्ण । हे ज्याचे त्याने जाणून । आपुले

आपण ठरवावे ।।५५।। त्यात भरावे विकार । किंवा मंगल विचार? । सुरा किंवा दुग्ध मधुर?। दुर्गुण की सद्‌गुण? ।।५६।। अरसिकता की रसिकता? । विषमता की समता? । अमानुषता की मानवता? । हे त्याने ठरवावे ।।५७।। सद्‌विचार-तोये सिंचलेले । रसिकतेने मोहरलेले । ज्यावरी मानव्याची फळे । सुमधुर लगटली ।।५८।। ऐसे जीवनाचे झाड । ज्याची समृद्ध छाया गोड । असावे हेचि कोड । असे शिवभक्ताचे ।।५९।। चुकलेल्यासी दावीत वाट । ऐसा परम आचारनिष्ठ । मानवामाजी श्रेष्ठ । वीरशैव मिरवला ।।६०।। आचारधर्माच्या ठायी । कोणाची सुटका नाही । राव रंक समान पाही । सकळांनी पाळावा ।।६१।। वृक्षवेलींनी वेष्टित पूर्ण । जैसा कृषक छेदूनि वन । भूमी शुद्ध करी आपण । पेरावयालागी पै ।।६२।। तैसे षड्‌विकारवृक्षांनी वेष्टित । प्रकृतिकाया-वनात । अनुतापकुठार मुक्त । चालवावी साधकाने ।।६३।। बुद्धिकुदळीने निर्घृण । कामक्रोधांचे कंद खणून। ज्ञाननांगर धरून । शुद्ध करावे देह-मन ।।६४।। मग परमार्थाच्या पिकासाठी । देह-मनाची भूमी गोमटी । सुयोग्य होय ही गोठी । मन्मथांनी विवरिली ।।६५।। भावे शिवपूजा करिता। गळूनि पडे देह-अहंता । निमिषे शिवभजन घडता । नाश पावे मनोमळ ।।६६।। पळे पळे सूर्य चढे। तो तो जगी प्रकाश वाढे । तैसे शिवभजने उजडे । साधकाचे मनाकाश ।।६७।। अंती येता अनुभव। चित्ती चैतन्याचा प्रसव । अंतर्बाह्य शिव- । स्वरूप तो होय ।।६८।। गंगा सागरी मिळून । न ये पुन्हा परतून । तैसी वृत्ती समरसून । जाई चैतन्यामाजी ।।६९।। तोचि मोक्ष जाणावा । जेथे निमती

जाणिवा । अद्वयसुखाच्या राणिवा-। वरी जीव बैसतो ।।७०।। ऐसा हा सुगम शिवयोग । मन्मथ विवरिती सांगोपांग । काव्यगंगेसी वेग । वर्णिता ये अपार ।।७१।। गुरुसेवेचा विधी । वीरशैवांचा नित्यविधी । मुक्त-बद्धाची लक्षणे बुद्धि-। पूर्वक ती निवेदिली ।।७२।। षट्स्थलांचे साग्र वर्णन । महावाक्याचे विवरण । ज्ञान-कर्म-संबंध जाण । तैसीच जंगमलक्षणे ।।७३।। नवलिंग भेदाकार । तैसाचि मिश्रलिंग विचार । आचार्यांचा अवतार-प्रकार । निवेदिला संपूर्ण ।।७४।। अंती वीरशैवदीक्षा वर्णून । श्रीगुरू नागेशासी नमून । मन्मथस्वामींनी ग्रंथलेखन । पूर्ण केले आनंदे ।।७५।। 'परमरहस्य' ऐकता श्रवणी । बसवराज तुष्टले मनी । म्हणती 'धन्य मन्मथ ज्ञानी । सिद्धान्त सुलभ विवरिला ।।७६।। आता करावे तीर्थाटन । आणि बोधावे सकल जन । शिवभक्ती रूढवून । मग एकान्त सेवावा ।।७७।। स्वयंप्रज्ञ तू भास्कर । तुझा वेगळा अधिकार । इतरासारखा साचार । तू नाहीस परपुष्ट ।।७८।। मग मठामाजी राहून । का स्वतःशी घ्यावे गोवून?। तू जाशील तिकडे पूर्ण । शिवभक्ती उजळेल ।।७९।। ज्या ज्या वनी वसंत जाय । तिकडे उमले पुष्पवैभव । तैसा तुझा पदरव । भक्तिवैभव उमलील' ।।८०।। परिसूनि श्रीगुरूंचे वचन । मन्मथ वदती कर जोडून । 'स्वामी आपुली कृपा पूर्ण । म्हणूनि लेखन घडले जी ।।८१।। नातरी मज पामराहाती । कैची ग्रंथसिद्धी निरुती?। कृपाहस्त मस्तकावरती । म्हणूनि घडले अघटित।।८२।। आता आपुल्या चरणा-जवळी । राहावे ही इच्छा उदेली । मजसी सेवा आपुली । मनोभावे घडावी ।।८३।। तरी माते

मोकलून । का अंतरावे गुरुचरण?'। बोलता मन्मथाचे लोचन । अश्रुजले भरती पै ।।८४।। पाहूनि मन्मथांची स्थिती । गुरुदेव हसून बोलती । 'तुझा विनय आम्हाप्रती । निश्चितचि जाणवला ।।८५।। परि तुझे कार्य महान । होईल का येथे बैसून?। म्हणूनि करीत तीर्थाटन । कार्य आपुले साधावे ।।८६।। पाण्याने वाहावे । देशिकाने चालावे । सूर्याने आभाळी भ्रमावे । दाही दिशा उजळीत ।।८७।। तुझ्या एकेका पावलापाठी । अज्ञाना लाभेल ज्ञानदृष्टी । मग उजळेल सर्वांघटी । अक्षय आत्मप्रकाश ।।८८।। तुज काही मिळविणे । नाही पुण्यसंपादने । लक्षावधी तीर्थस्नाने । तुझ्यासाठी व्यर्थचि ।।८९।। तू स्वये तीर्थरूप । तुझ्या दर्शने हरे पाप । आणि पुण्य जोडे अमाप । सारे आम्ही जाणतो ।।९०।। म्हणूनिया तू भ्रमावे । अज्ञान्यांसी उद्धरावे । स्वधर्मभ्रष्टासी लावावे । पुन्हा धर्माचरणासी' ।।९१।। श्रीगुरूचे ऐकूनि बोल । अंतरी उठती भावकल्लोळ । 'आज्ञा' म्हणूनि पदकमळ । मन्मथाने वंदिले ।।९२।। पुढील कथा मनोरम । श्रोते अवधारा सप्रेम । तुमचे पाहता अवधान । रंग चढे कथेसी ।।९३।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत । भाविकांचे ऋण फेडीत । रचून मन्मथचरित हे ।।९४।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने भक्तियुक्त । पंचमोऽध्याय गोड हा ।।९५।। श्रीशिवार्पणमस्तु ।।



# अध्याय सहावा

।। श्रीगणेशाय नमः।। ॐ नमो सद्गुरू । श्रीविश्वाराध्य जगद्गुरू । विश्ववंद्य विश्वगुरू । काशीज्ञानपीठाचे ।।१।। विश्वेश्वर लिंगातून । तुमचे झाले अवतरण । योगमायेने देहधारण । तुम्ही केले दयाळा ।।२।। युगीयुगीचा शिवधर्म । तुम्ही पुन्हा केला स्थापन । जागविला लोकमनातून । अष्टावरण पंचाचार ।।३।। ज्ञानपीठाच्या ज्ञानगंगेत । अवघे जग केले सुस्नात । विश्वी ज्ञान उजळीत । विश्वेशलिंगी ऐक्य झाले ।।४।। हे मन्मथचरितामृत । पूर्णत्व पावो निश्चित । ऐसे वरदान सत्य । द्यावे मज दयाळा ।।५।। असो पूर्वाध्यायी कथन । मन्मथे करावे तीर्थाटन । ऐसी गुर्वाज्ञा पूर्ण । मन्मथांनी मानिली ।।६।। अवश्य म्हणोनि मन्मथ । वंदूनि गुरुचरण पुनीत । निघती तोच एक मात । कर्णद्वारी आदळली ।।७।। शिवलिंगस्वामी शिवैक्य झाले । मन्मथांचे छत्र हरवले । परिसता दोन्ही डोळे । झरावया लागले ।।८।। नेत्रीचे पुसूनि नीर । क्षणी एका केला विचार । या जगी कोण अमर । आजवरी झाला असे? ।।९।। राम-कृष्ण आले गेले । परि विश्व नाही थांबले । कालनदीचे नच खुंटले । वाहणे कोणासाठीही ।।१०।। परि आपुली माय स्नेहाळ। झाली असेल शोकविव्हळ । तिचे दुःख करणे शीतल । धर्म असे पुत्राचा ।।११।। ऐसे मनी विचारून । जवळी केले स्वग्राम । द्वारी उभे राहता परम । शोकार्णव उसळला ।।१२।। घालूनि

पुत्रासी गळामिठी । पार्वती रडे पतीसाठी । तिच्या विलापे सर्वांपोटी । दुःखवेदना जागली ।।१३।। ओसरता शोकपूर । मन्मथ बोलती गंभीर । 'माये सांग आजवर । कोण जिवंत राहिला? ।।१४।। अस्तंगत होण्यालागी । सूर्य उगवतो जगी । फूल उमले सर्वांगी । अंती कोमेजण्यासाठीच ।।१५।। तैसा जन्मल्यासी अंत । जन्मताचि असे निश्चित । मृत्यू रोखणारा सत्य । कोण जगी जन्मला? ।।१६।। देह असे नाशिवंत । त्याची का करावी खंत? । उसासे ऐकूनि दुःखार्त । कोण जिवंत जहाला? ।।१७।। पद्मदळावरला थेंब । त्यास म्हणावे का थांब?। जलाशयीचे चंद्रबिंब । कैसे हाती येईल? ।।१८।। देहातीत जे शाश्वत । व्याप्त अवघ्या जगतात। त्या चैतन्यासी निश्चित । जन्ममृत्यू नसेचि ।।१९।। जे 'नाही' ते असेना । जे 'आहे' ते नासेना । नाशिवंत ते टिकेना । आणि मरेना अक्षय ।।२०।। देहासवे जडले मरण । मरू नये ऐसे बोले कोण? । राव रंक अवघेजण । मरणपंथे पै गेले ।।२१।। जाणूनि हे सत्य एक । माये आवरी तुझा शोक' । ऐसा आत्मानात्मविवेक । मन्मथ सांगती मातेसी ।।२२।। मन्मथांचे ऐकून बोल । दुःख मातेचे शमले सकळ । व्यक्तिमत्त्व विवेकशील । जाणूनि मनी आल्हादली ।।२३।। शोकावेग आवरून । म्हणे 'तुजसवे येईन । तीर्थे करिता अंतःकरण । पूर्ण शांत होईल' ।।२४।। सारूनि सकळ अंत्यविधी । तीर्थाटनी निघाली मांदी । समानशील सखे-शिष्यादी । मन्मथासवे

निघाले ।।२५।। शिवनामाचा घुमवीत घोष । भ्रमण करिती दिवसेंदिवस । शिवदीक्षा वीरशैवांस। देत यात्रा चालली ।।२६।। ज्या ठायी मावळे दिन । तेथे करावे शिवकीर्तन । अभंगांत जावे रंगून । आठवीत शिवलीला ।।२७।। बोधूनि शिवसिद्धान्त । वीरशैवांसी करावे जागृत । त्यांना दाखवूनि स्वत्व । मग पुढारा निघावे ।।२८।। ज्यांनी स्वधर्म विसरून । अन्य पंथी केले गमन । ते सकल परतून । येती मन्मथप्रभावाने ।।२९।। गुरुदेवांचे वचन सार्थ । जेथे पाय ठेविती मन्मथ। तेथे दरवळला निश्चित । सुगंध शिवभक्तीचा ।।३०।। ज्योतिर्लिंग वैद्यनाथ । पाहिला औंढ्या नागनाथ। घृष्णेश्वराच्या दर्शनार्थ । एलापुरी पातले ।।३१।। तेथील देखता पाषाणलेणी । आनंदोर्मी दाटती मनी । धन्य कलावंतांची जननी । ज्यांनी निर्मिली पाषाणशिल्पे ।।३२।। पुढती आक्रमिती वाट । शिवनामी गुंतले ओठ । वाहती अंतर्यामी लोट । शिवभक्तीचे अपार ।।३३।। पुढे देखिले पंढरपूर। जे वैष्णवांचे माहेर । कटेवरी ठेवूनि कर । उभे सावळे परब्रह्म ।।३४।। भीमाजळी करूनि स्नान । घेऊनि विठ्ठलाचे दर्शन । मग आरंभिले कीर्तन । वाळवंटी येऊनिया ।।३५।। जेथे हरिकीर्तन घडे । विठ्ठलवीर नाचती गाढे । उधळीत अबीरगुलाल पुढे । धुंद गाती हरिलीला ।।३६।। तेथे शिवपर अभंग । घेऊनि आरंभिला कीर्तनरंग । श्रोतियांचे अंगांग । रोमांचित जहाले ।।३७।। शिव शिव म्हणता वाचे । काय गेले तुझ्या बाचे? । शिवनाम घेता वाचे । वैष्णवांचे दोष

जाती ।।३८।। शिवावाचूनि आहे कोण । विठ्ठलमस्तकी शिव जाण । शिवनाम श्रेष्ठतम । पापी नष्ट उद्धरती ।।३९।। मन्मथांची वाणी निर्भय । अवघी झाली शिवमय । गाऊ लागे तेजोमय । शिवप्रताप आगळा ।।४०।। विठ्ठल विठ्ठल ज्या स्थानी । संचला होता वातावरणी । तेथे शिवमाहात्म्य गाऊनी । निर्भयत्वे प्रेरिले ।।४१।। असो क्रमूनि काही दिन । पुढती निघाले शिवगण । अंतराळ दुमदूमून । शिवनामाने टाकिले ।।४२।। शंभुराजाचे शिखर । ध्वजा फडके नभावर । सकल करिती नमस्कार । आदरयुक्त सप्रेम ।।४३।। शांतलिंगस्वामींसी शिंगणापुरी । मन्मथ भेटले उराउरी । परस्परांच्या अंतरी । आदरभाव दाटला ।।४४।। कन्नड 'विवेकचिंतामणी'। अनुवादिला मराठीतूनी । तैसाचि 'करणहसुगे' आणी । शांतलिंग मराठीत ।।४५।। ऐसे शांतलिंग ज्ञानी । त्यांना भेटले मन्मथस्वामी । एकचि कार्य भिन्न स्थानी । उभयतांनी आरंभिले ।।४६।। त्या उभयतांची भेट । जैसी दो बिंबांची पडे गाठ । गंगायमुनेचे ओघ एकवट । जैसे होती प्रयागी।।४७।। अंतरीचे गुज निर्मळी । कथिती एकमेकांजवळी । हृदयकपाटे मोकळी । करिती उभय ते ज्ञाते।।४८।। ये हृदयीचे ते हृदयी । भाव बिंबे ते समयी । तत्त्वचर्चेच्या प्रवाही । कालक्रमण होतसे ।।४९।। अंती जड अंतःकरण । नेत्री प्रेमाश्रू आणून । मन्मथांची बोळवण । केली शांतलिंगांनी ।।५०।। पुढत पुढती मेळा चाले । पाउली मेळवूनि पाउले । शिवनामाच्या कोल्हाळे । अंतराळ गजबजे

।।५१।। भीमाशंकर ज्योतिर्लिंग । तया पुजूनि यथासांग । तीर्थे करीत शिवयोग । जना बोधीत निघाले।।५२।। तीर्थाटनाच्या निमित्ती । पाहिली सकळ देशस्थिती । जागविली शिवभक्ती । लोपलेली महाराष्ट्री ।।५३।। धर्मधारा झाली क्षीण । तिला दिधले संजीवन । गुरुदेवांचे कार्य जाण । पूर्ण केले मन्मथे ।।५४।। भाळी भस्म चर्चिलेली । लिंगधारण हृदयाजवळी । ऐसी शिवभक्त मंडळी । ग्रामोग्रामी दिसू लागे ।।५५।। बिल्वपत्राच्या उग्र गंधे । शिवभक्ताचे घर कोंदे.। 'शिव शिव' ऐशा शब्दे । घर मंद गर्जतसे ।।५६।। परिसाया मन्मथाचे कीर्तन । लोक वेगी येती धावून । स्वधर्माचे रहस्य परम । रसाळपणे निवेदिती ।।५७।। संपवूनि तीर्थाटन । यात्रेचे मावंदे घालून । सकलांसी निरवून । एकान्तस्थान शोधले ।।५८।। हरगंडीजवळी डोंगर । निसर्गरमणीय मनोहर । सांप्रत 'शिवकडा' साचार । ज्यासी जन संबोधिती ।।५९।। तेथील निगूढ गुंफेत । बैसले स्वामी ध्यानस्थ । लोकान्ताहूनि एकान्त । जीवा बहू आवडे ।।६०।। भक्ती वैराग्य ज्ञान । अंगी ठसावले पूर्ण । लौकिकाचा मान । आता कदा आवडेना ।।६१।। बुडवूनि ब्रह्मानंदी चित्त । इंद्रिये ब्रह्मरूप समस्त । जे ज्ञान निरूपिले जनांप्रत । त्याचे सुख भोगावे ।।६२।। म्हणूनि ज्ञानबोधाच्या सागरी । बुडी घेतली ते अवसरी । त्या सुखाचे उमाळे अंतरी । लाटेपरी कल्लोळती ।।६३।। उघडती मिटले लोचन । शब्द दिसती तेजोघन । ज्ञानबोधाच्या लहरी सघन ।

हृदयामाजी हेलावल्या ।।६४।। पुन्हा शब्द लागती झरू । लागे अंतःकरण पाझरू । या अवस्थेसी रूप करू । पाहे शब्दांमधूनी ।।६५।। मग रचिला 'ज्ञानबोध'। ज्ञान अज्ञान वैराग्य प्रसिद्ध । भक्ती महावाक्य दशविध । संतलक्षणे वर्णिली ।।६६।। मी कोठील कोण मूलस्थान । ऐसी जरी कळली खूण । या ज्ञानासी आत्मज्ञान । ऐसे नाव लाहिजे ।।६७।। देहबुद्धी असे स्वभावे । तया अज्ञान म्हणावे । कर्मफलाशेसी त्यागावे । तेचि जाणावे वैराग्य ।।६८।। उत्तम भक्ती ज्ञानोत्तर । ईश्वर होऊनि यजावा ईश्वर । आपुले सुख आपण भोगणार । सर्व आपण म्हणूनी ।।६९।। जे जे भूतमात्र देखिजे । ते ते आत्मसूत्री भजिजे । यासी भक्ती नाम साजे । मन्मथस्वामी वर्णिती ।।७०।। ऐसा 'ज्ञानबोध' ग्रंथ । रचूनि पावला पूर्णत्व । परी शब्दांचा ओघ मात्र । यत्किंचितही थांबेना ।।७१।। पूर्णचंद्राच्या भेटी । सागर उधाणे काठोकाठी । पाऊसकाळी गोदातटी । जैसे जल विस्तारे ।।७२।। की पुष्पाचा परिमळ । जैसा वितरे सर्वकाळ । तैसे मन्मथचित्ती रसाळ । शब्द राहिले दाटूनी ।।७३।। मग अनुभवाचा आनंद अमूर्त । लेऊनि शब्दांचे रूप समर्थ । झाला प्रकट यथार्थ । तोचि ग्रंथ 'अनुभवानंद' ।।७४।। प्रमेयसुगंधे दरवळे । येथे पूर्ण विवेक उजळे । अध्यात्माचे अध्यात्म आगळे । येथे संचले शब्दांत ।।७५।। येथे पंथीयता नुरे । दुजेपण मागे सरे । निखळ आनंद उरे । अद्वयानुभवाचा ।।७६।। ग्रंथ पूर्णत्व पावला । परि

शब्दौघ नाही सुकला । मन्मथचित्ती हेलावला । काव्यसिंधू अगाध ।।७७।। मग मन्मथांचे मनाकाश । उजळीत ग्रंथ 'स्वयंप्रकाश'। हळूहळू ये आकारास । शब्दांत अर्थ साठवून ।।७८।। सप्तप्रकरणांपर्यंत । ग्रंथ गेला विस्तारत । समाप्त करिती मन्मथ । नागेशासी वंदूनी ।।७९।। रचूनि 'स्वयंप्रकाश' सुंदर । तोषले मन्मथांचे अंतर । आता काव्योर्मीसी उतार । कृतार्थतेने पडियेला ।।८०।। लोकजागृतीलागी देखा । रचिली 'परमरहस्य' टीका । अन्य ग्रंथ स्वांतसुखा-। लागी जाण रचियेले ।।८१।। मन्मथस्वामींची कीर्ती । परिसरात होय गाजती । दर्शनास्तव येती । जन बहुसंख्येने ।।८२।। ज्यासी अध्यात्म आवडे । ऐसे मुमुक्षू जन थोडे । अन्य चमत्काराचे वेडे । येती अधिकाधिक ते ।।८३।। पाहूनिया चमत्कार । संतासी करावा नमस्कार । ऐसा वेडगळ विचार । बाळगती अंधळे ।।८४।। संतापाशी जाऊन । पोटी मागती संतान । आपुले ऐहिक कल्याण । करावे म्हणती संताने ।।८५।। ज्यासी विषय नावडे एक । त्यापाशी मागती विषयसुख । अंधश्रद्धेचे कवतिक । किती वानिता सरेना ।।८६।। ऐसिया लोकांची राहाटी । वाढली डोंगर-कपाटी । पाहूनि मन्मथस्वामी कष्टी । मनातूनि जहाले ।।८७।। म्हणे एकान्तसाधनेलागी । आलो होतो ये जागी । आता अन्य स्थानी वेगी । येथूनि जावे हे भले ।।८८।। यावरी निसर्गमनोहर । क्षेत्री पातले कपिलधार । वृक्षवेलींचीं अपार । जेथे गर्दी दाटली ।।८९।। व्याघ्रसिंहादी श्वापदे ।

तेथे विचरती स्वच्छंदे । कड्यावरूनि गर्जत नादे । धारा नदीत लोटल्या ।।९०।। नानापरीचे वृक्ष दारुण । वेलींचे माजले रान । निबिड काननी कोण । पाऊल ठेवू शकेना ।।९१।। परि ज्याचे सर्वभाव । अवघे झाले शिवमय । ज्यासी इंद्रियाचे गाव । नाठवेचि आठविता ।।९२।। वैराग्य धडधडीत अंगी । जो रंगला आत्मरंगी । ऐसा मन्मथ शिवयोगी । तेथे जावया भियेना ।।९३।। रामानंद सदाशिव । सवे घेऊनि शिष्यद्वय । कपिलधारी निर्भय । स्वामी नांदती प्रीतीने ।।९४।। शंकराच्या जटेतूनी । जैसी उतरावी स्वर्धुनी । तैसी डोंगरकड्यावरूनी । खाली उतरे शुभ्र धार ।।९५।। स्नाने कपिलधारेखाली । मनोभावे उरकिली । बैसले बिल्ववृक्षातळी । स्वामी ध्यानस्थ होऊनी ।।९६।। नित्य कपिलधारी स्नान । सहा वेळ इष्टलिंगार्चन । शिवध्यान शिवचिंतन । रमणे आत्मस्वरूपी ।।९७।। स्वामी झाले जीवन्मुक्त । परी जोवरी देह जिवंत । तोवरी आपुले नित्यव्रत । आचरती एकनिष्ठेने ।।९८।। आता पुढील अध्यायात । समाधी घेतील मन्मथ । हृदयावरी ठेवूनि हात । परिसावी ती कथा ।।९९।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत । भाविकांचे ऋण फेडीत । रचूनि मन्मथचरित हे ।।१००।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । होतील मने निष्ठायुक्त । षष्ठोऽध्याय गोड हा ।।१०१।। श्रीशिवार्पणमस्तु ।।



# अध्याय सातवा

।। श्रीगणेशाय नमः।। जय जय श्रीमन्मथस्वामी । सकलसंतशिरोमणी । तुमची कथा गावी कवनी । ऐसा धरिला बाळहट्ट ।।१।। बाळकाची वेडी आळ । वेगी सर्वकाळ । ऐसा थोरांचा प्रेमळ। स्वभावगुण असेचि ।।२।। तुमच्याचि प्रसादाने । जमले अक्षरांशी खेळणे । हृदयाचे पाझरणे । उतरले शब्दांत ।।३।। तुमची तेजोमय मूर्ती । जी ठसली हृदयावरती । तीच आता श्रोत्यांपुढती । उभी राहिली शब्दांत ।।४।। पुरवावा इतुका अर्थ । लेखणी करावी समर्थ । तुमचा समाधिप्रसंग सार्थ । वदवावा मुखातून ।।५।। आता श्रोतेहो सावधान । ऐकावे समाधिप्रकरण । मन्मथनामक दीप विझून। कैसा गेला त्यावेळी ।।६।। तुम्ही श्रोते चतुर । निवडू जाणता नीरक्षीर । हृदयासी फुटती पाझर । जिज्ञासेने तुमच्याचि ।।७।। तरी बालक मानून । मजला घ्यावे सांभाळून । बोल बोबडे ऐकून । मनी करावे कौतुक ।।८।। कपिलधारी निर्भय । वसती मन्मथ आणि शिष्य द्वय । आयुष्याचा संध्यासमय। समीप ठेपला येऊनी ।।९।। आयुष्यासी पूर्णत्व आले । शिवराजासी जाणवले । कार्य पूर्ण साधले। आता समाधी स्वीकारावी ।।१०।। जो देहीच असता विदेही । त्यासी कैचा देहान्त पाही । जरी कुंभ बुडे प्रवाही । अंतर्बाह्य जळ असे ।।११।। तैसा देहान्ती होय मुक्त । ही मात असे अनृत । जो झाला जीवन्मुक्त । त्यासी कैची समाधी? ।।१२।। परि ही निसर्गराहाटी । देह लागे टाकावा शेवटी । हे

जाणूनिया नेत्रपाती । मन्मथांनी उघडली ।।१३।। बोलती दोन्ही शिष्यांलागून । तुम्हा सांगतो एक खूण । आपुली मने आवरून । स्थिर करा सायासे ।।१४।। येथे देहविसर्जन । करावे ऐसे माझे मन । परी लोकांलागून । ही मात न कळावी ।।१५।। ऐकूनि श्रीगुरूंचे बोल । शिष्य अंतरी होती विव्हल। रामानंद म्हणे 'नवल । स्वामी आज ऐकले ।।१६।। ज्या मुखे ऐकले ब्रह्मज्ञान । त्याच मुखे हे विंदाण। उदकामाजी लागला अग्न । ऐसे आज वाटतसे ।।१७।। तुम्ही आश्रयिले बहुत । पुरविले बहुतांच्या मनीचे अर्थ । शिष्यासी नेणवूनि मात । कैसी समाधी घेतसा? ।।१८।। सर्व शिष्यांसी पाचारून । मेळवूनि संतसाधुजन । करूनि शिवकथाकीर्तन । देऊनि दर्शन सकळिका ।।१९।। साक्षी ठेवूनि समस्त । मग होणे समाधिस्थ । हेचि असता उचित । आगळे का बोलता?' ।।२०।। परिसूनि शिष्यवचन । मन्मथ बोलती सावधान । योगियासी लौकिक मान । कदाकाळी नसावा ।।२१।। भोगाया एकान्तीचे सुख । डोंगर वसविला देख । जरी येथे सकळीक । अंतकाळी पातले ।।२२।। आकृती तितुकी प्रकृती । अवघ्यांची नसे एक स्थिती । बहुतांच्या चित्तवृत्ती- । सारखे मन धावेल ।।२३।। जडभरत ज्ञानसंपन्न । परि वनी पोषिले हरीण । त्याशी चित्त गुंतवून । अंतकाळी स्मरीतसे ।।२४।। मग लाधला मृगदेह । ऐसी संगाने हानी होय । ज्यांचा जन्मवरी स्नेह । माझ्याठायी जडलासे ।।२५।। ते माझ्या अंतसमयी । काय उगे राहती पाही? । आक्रोशूनि दिशा दाही ।

दणाणूनि सोडतील ।।२६।। माझा होण्याआधी अंत । आपुला करतील प्राणघात । राहील का निश्चल चित्त । माझे रामानंदा सांग? ।।२७।। यालागी तयांना दुरी । ठेवूनिया ये अवसरी । आलो मी कपिलेश्वरी । देहत्याग करावया ।।२८।। आणिक एक गुजगोष्ट । तुजसी सांगतो प्रकट । सर्वांतीत ब्रह्मनिष्ठ । आम्ही असू निश्चये ।।२९।। कैचा पुत्र शिष्य माया । आम्हालागी सांग राया?। गुरू शिष्य भिन्न जाणाया । वस्तू तरी एकचि ।।३०।। ऐसे असता अभिन्नपण । का मेळवावे अवघेजण? । तरी आता द्वैत त्यागून । भूमिका सिद्ध करावी' ।।३१।। ऐकूनि श्रीगुरूंचे बोल । शिष्यचित्त झाले शीतल । वंदूनि गुरूंचे पदकमल । पुढती कार्या लागले ।।३२।। मंगळ आणि बुध दिन । सकळ विधिनेम सारून । सद्ग्रंथांचे विवरण । मन्मथांनी आरंभिले ।।३३।। जे होऊनि गेले संत । त्यांच्या आठव करी चित्त । श्रीगुरू नागेशाचा समर्थ । प्रताप मनी आठविला ।।३४।। तैसेचि दीनोद्धारस्वामी । त्यांना नमिले अंतर्यामी । बुधवारी रात्रंदिनी । केले शिवकीर्तन ।।३५।। प्रातःकाळी करूनि स्नान । आरंभिले लिंगार्चन । उपरी सारूनि भोजन । एक प्रहर क्रमिला ।।३६।। सदाशिव रामानंद । शिष्यद्वय होते सन्निध । ते पाहती तव सिद्ध-। चिन्हे आगळी देखती ।।३७।। योगमुद्रा प्रकटे ज्योती । पालटली देहाकृती । तेज विलसे वदनावरती । नेत्र झाले अथांग ।।३८।। पाचारूनि शिष्या सिद्ध । म्हणती 'ऐका रे सावध । ज्यावेळी आठवाल शब्द । मी सन्निध आहे तुम्हा ।।३९।।

आकाश फोडूनि दूर । मी नाही रे जाणार । येणे जाणे हे साचार । आहे खोटे मजविषयी ।।४०।। मी स्वतःसिद्ध पूर्ण । जो करील माझे चिंतन । मी तयालागी जाण । असे जवळी निश्चये ।।४१।। जे सद्गुरुमार्गी जन । त्यांचे व्हावे कल्याण । ब्रह्मरूप अवघेजण । सर्वकाळ होवोत' ।।४२।। ऐसे बोलून शिवराज । आरंभिती समाधीचे गुज । मूळबंध आसनी सहज । तेवेळी बैसले ।।४३।। बिल्ववृक्षातळी । समभाव भूमिका केली । आसनविधी आरंभिली । शिष्यद्वय पाहती ।।४४।। एकाग्र करूनिया मन । साधिले मूळबंध आसन । ठेले अंतःकरण स्फूर्तीचे वहन । प्रवेश अंतरी मांडला ।।४५।। दोन्ही नेत्र स्थिरावले । पंचप्राण पांगुळले । शरीराचे चलन ठेले । श्वास राहिले नासाग्राचे ।।४६।। हस्तपाद अचंचळ । देह तटस्थ झाला केवळ । हाले चाले न बोले बोल । आत्मा स्थिरावे ब्रह्मांडी ।।४७।। यावरी जावे उल्लंघून । तव हंबरडा फोडती दोघेजण । प्राणांतिक आक्रोश मांडून। शंखध्वनी करिताती ।।४८।। अधोमुख रुदन थोर । त्या नादे गाजे डोंगर । ऐकता गजबजे अंतर । राहे भावना समाधीची ।।४९।। घात झाला संगामुळे । उघडली दोन्ही नेत्रकमळे । आरक्त लोचने पाहती तेवेळे । दोघे रडताती अधोमुख ।।५०।। बोलती क्रोधे तयाप्रती । 'का रे राहिला माझ्यासंगती?। लौकिक सांडूनि आलो एकान्ती?। तरी तैसेचि जहाले ।।५१।। इतुके बोधिले सकळ । तरी रडाया उतावीळ । जडभरताचा केवळ । न्याय झाला आम्हासी ।।५२।। ऐक रामानंदा वचन । का तुम्ही

करिता रुदन?'। तव तो चरणी माथा ठेवून । म्हणे 'कोड पुरले जी ।।५३।। आपुला देह अचेतन। नव्हते शरीराचे भान । पाहूनि वाटे मरण । आपुले नाथा ओढवले ।।५४।। आम्ही केवळ अज्ञान । काय जाणावी अंतरखूण । म्हणूनिया रुदन । आम्ही नाथा केले असे' ।।५५।। ऐकूनि मनी करिती विचार । यांना पाठवावे दूर । नातरी अंतराय थोर । समाधीसी करतील ।।५६।। मग बोलती 'रामानंदा । केव्हा देखेन त्या आनंदा । हे ठाऊक नाही कदा । ते करणे देवाचे ।।५७।। काय वृद्धत्व मज आले?। तुम्ही माझे मरण कल्पिले । ऐसे वोखटे इच्छिले । कैसे तुम्ही शिष्यांनी? ।।५८।। उठता न उठवे अशक्त । काय दिसतो तुम्हाप्रत?। काय आले अंधत्व?। की झालो बहिरा मी?।।५९।। बोबडी झाली रसना?। की दंतपंक्ती पडल्या जाणा?। मस्तक हाले का क्षणोक्षणा?। की मरणकळा पातली?।।६०।। काही नसता मरणचिन्ह । तुम्ही व्यर्थ केले रुदन । अरे आम्ही आंतरध्यान । करीत होतो ते समयी ।।६१।। मज कैचा अंत येवेळी । न कळे घडे कोण्याकाळी । अजूनि तुम्हाजवळी । आहे रे मन्मथ नाही गेला' ।।६२।। ऐसी देऊनिया भाष । त्यांचे शांत केले मानस । मग म्हणती सदाशिवास । 'मांजरसुंब्यात तू जाई।।६३।। वाटे भक्षावी साखर । तरी आणूनि दे सत्वर' । अवश्य म्हणूनि झडकर । गेला मांजरसुंब्यासी ।।६४।। मग रामानंदा सांगती । 'तू जाय पंचकुंडावरती । पंचकुंडाचे जीवन मजप्रती । आणूनिया देई का ।।६५।। पंचकुंडाचे जीवन । वाटे करावे प्राशन' । अवश्य म्हणोनि तेथून । रामानंद निघाला ।।६६।। ऐसा तोडूनिया संग । मन्मथस्वामी झाले निःसंग।

पुन्हा आरंभिला रंग । समाधिसोहळ्याचा ।।६७।। बैसले मूळबंध आसनी । इंद्रियांसी बंधन देऊनी। मनबुद्धी अंतःकरणी । स्फूर्ती पूर्ण स्थिरावली ।।६८।। थांबले श्वासाचे वहन । स्थिरावले दोन्ही लोचन । परापश्यंत्यादी वाचा जाण । तेथे उग्या राहिल्या ।।६९।। पिंड ब्रह्मांड वेगळे झाले । ज्ञप्तिमात्र चैतन्य उरले । जैसे जळी लवण विराले । तैसे ब्रह्मी ब्रह्मरूप ।।७०।। ऐसे झाले समाधिस्थ। तुटली शरीराची उपाधी मात्र । दिसे रूप बैसले ध्यानस्थ । साक्षिभूत शरीराकृती ।।७१।। दोघे येऊनि त्या स्थानी । रूप पाहती न्याहाळूनी । म्हणती तैसीच करणी । पुन्हा झाली असेल ।।७२।। धरूनिया पाहती कर । तो अचेतन पडे अंगावर । क्षणी येऊनि भानावर । म्हणती 'गुज साधले ।।७३।। आम्हा दुरी पाठवून । शिवराज गेला टाकून । आम्हा दाही दिशा शून्य । आज केवळ जहाल्या ।।७४।। आता जगलोक दुजा झाला । शिवराज टाकूनि गेला । न कळता घात केला । देहान्त साधला एकाएकी ।।७५।। भवजळी बुडाले तारू । आमुचा लोपला दिनकरू । आता लागले अंधारू । आयुष्य आमचे बापा हो ।।७६।। मायबापा कोण्या जन्मी । भेटशील आम्हालागूनी?'। ऐसे विचारीत क्षणोक्षणी । आलिंगिती देहासी ।।७७।। सूर्य चढता आकाशी । अंधःकारं पसरे मानसी । शिष्यद्वयाच्या शोकासी । पूर पातला तेवेळी ।।७८।। घळघळून दोघे रडती । भूमीवरी घालूनि घेती । गुरुवियोगे फुटो पाहती । हृदये गुरुभक्तांची ।।७९।। ऐशापरी करिती रुदन । तेथे मिळाले बहुजन । मन्मथासारिखे गेले निधान । हे ऐकूनि लोक आले ।।८०।। मग विधिपूर्वक सांग।

बिल्वपत्रे झाकले सर्वांग । शंख घंटा वाजवूनि यथासांग । केली पूर्ण समाधी ।।८१।। चतुर्थी तिथी मास फाल्गुन । शुक्ल पक्ष उत्तरायण । गुरुवासरी माध्यान्ह । समाधिपीठिका साधली ।।८२।। ऐसा सकळांचा विसावा । निघूनि गेला दूर गावा । जाणीव देत वीरशैवा । अस्मितेची आपुल्या ।।८३।। काळमाथ्यावरी वहिली । स्वनामाची मुद्रा ठोकली । मग हळुवार पाउली । गमन केले पैलतीरी ।।८४।। तयाचा करिता आठव । स्वत्वाची व्हावी जाणीव । धर्मकार्य मानवतेस्तव । ज्याने जीवित्व वेचले ।।८५।। ती तयांची प्रेरणाशक्ती । संचारावी आपुल्या चित्ती । आपणाकडूनि यथाशक्ती। कार्य तैसे घडावे ।।८६।। मन्मथांचे चरित्रकथन । आज झाले संपूर्ण । जरी कोठे असेल न्यून । क्षमा करावी मजप्रती ।।८७।। बसवलिंगकृत समाधि-अभंग । त्याचा आधार घेऊन सांग । मन्मथांचा समाधिप्रसंग । अल्पमतीने वर्णिला ।।८८।। मन्मथ गेले निघून । मागे राहिले साहित्यधन। ती वाङ्मयी मूर्ती जाण । मन्मथशिवलिंगांची ।।८९।। शब्दाशब्दांतून समर्थ । प्रकटती स्वामी मन्मथ । आपुल्या स्वत्वाची देत । प्रतिक्षणी जाणीव ।।९०।। शिवभक्ताच्या कुळात । जो जन्मला निश्चित । त्याने केवळ उमाकांत । एकनिष्ठेने आराधावा ।।९१।। भस्म रेखावे भाळी । गावी शिवनामावळी। अन्य पंथांची चिन्हे सगळी । निक्षूनिया वर्जावी ।।९२।। दुसऱ्याच्या बापासी बाप म्हणणे । हे जैसे लाजिरवाणे । तैसे अन्य दैवता भजणे । शिवकुळी जन्मूनी ।।९३।। शिव विष्णू

आणि राम । मुळी एकचि परब्रह्म । परि एकनिष्ठेने परम । एका रूपा भजावे ।।९४।। विष्णुकुळी जन्मावे । तरी विष्णुरूपा भजावे । शिवकुळी जन्मा यावे । तरी भजावे शिवरूपा ।।९५।। दहा हात एका स्थानी । विहीर खोदता लागे पाणी । जरी पृथक् दहा स्थानी । एकेक हात खोदले ।।९६।। तरी कैसी व्हावी विहीर?। आणि कैसे मिळावे नीर?। तैसी निष्ठा दहा देवतांवर । ठेवता फळ मिळेना ।।९७।। म्हणूनि एकनिष्ठेने पूर्ण । करावे एकदेवाचे भजन । शिवभक्ताने सप्रेम । शिव निष्ठेने भजावा ।।९८।। आपुले शिवभक्त कूळ । आपुले आराध्य जाश्वनीळ । म्हणूनि रुद्राक्षाची माळ । गळा घालावी प्रीतीने ।।९९।। जो घाली तुळसीमाळ । त्याने वर्जिले आपुले कूळ । तो व्यभिचारी केवळ । यात नसे संशय ।।१००।। शिवनिष्ठा जागविली । अशी ही मन्मथमाउली । तिच्या कृपेची सावली । असो वीरशैवांवरी ।।१०१।। मन्मथस्वामी तेजोदीप । प्रकाशली मने अमाप । शिवभक्तीचे दीप । घरोघरी लाविले ।।१०२।। चैतन्याचे मळे । गावोगावी फुलविले । मृत मनांना दिले । संजीवन सर्वकाळ ।।१०३।। ग्रंथ आणि अभंगांत । मन्मथस्वामी अजूनि जिवंत । श्रद्धाबळाने सत्य । भेटतील भक्तांना ।।१०४।। हे मन्मथचरितामृत । मन्मथशिवलिंगाचीच मूर्त । पठण करिता श्रद्धायुक्त । मन्मथदर्शन घडेल ।।१०५।। आपुले स्वत्व सापडेल । अंतरी शिवभक्ती फुलेल । अनंतकाळ उजळील । वाट आत्मकल्याणाची ।।१०६।। असो संपले ग्रंथलेखन । सर्व साधुसंता

नमन । जगद्गुरू कुलगुरूसी वंदन । माझे सदा असावे ।।१०७।। विदर्भप्रांती वत्सगुल्म । क्षेत्र अति पुरातन । सांप्रत ज्याचे अभिधान । 'वाशीम' ऐसे जहाले ।।१०८।। दक्षिणेकडे तेथून । उणे अंतर एक योजन । 'केकतउमरा' नामे ग्राम । ते जन्मस्थान पै माझे ।।१०९।। दक्षिण महाराष्ट्राभीतरी। श्रीसिद्धरामांची नगरी । त्या प्रसिद्ध सोलापुरी । आता निवासी जहालो ।।११०।। संत शिवदासाने पूर्ण । येथेचि केले ग्रंथलेखन । सिद्धेश्वरपुराण बसवपुराण । मराठीतून रचिले ।।१११।। ऐसी समृद्ध परंपरा । लाधलीसे ज्या नगरा । तेथेचि मी अवधारा । रचिले मन्मथचरित हे ।।११२।। मी रचिले ऐसे म्हणावे । तरी आत्मस्तुतीसी पात्र व्हावे । लेखन घडले जरी स्वभावे । तरी करविते भाविक जन ।।११३।। देवाप्पा नामे पिता । विठाबाई माझी माता । वंदूनिया उभयता । ग्रंथलेखन संपविले ।।११४।। स्वामी सिद्धलिंगांचा अनुग्रहीत । शेषनारायण विठाबाईसुत । आज झाला ऋणमुक्त। रचूनि मन्मथचरित हे ।।११५।। इति श्रीमन्मथचरितामृत । आदरे परिसोत भाविक भक्त । सकळांसी सापडावे स्वत्व । सप्तमोऽध्याय गोड हा ।।११६।। श्रीशिवार्पणमस्तु ।।

।। श्रीमन्मथचरितामृत ग्रंथ समाप्त ।। शुभं भवतु ।।



# मन्मथस्वामींची आरती

आरती शिवराजा । मन्मथ स्वामी महाराजा ।।
वेदान्ताचे सार । मुख्य पेरिले बीज ।।धृ.।।

समाधि महास्थळी । सर्पव्याघ्रांची जाळी ।
निर्वैर श्वापदे हो । समदृष्टीने न्याहाळी ।।१।।

शिवभक्ती लोप झाली । विश्व शिवमय केले ।
ग्रंथ हा परमरहस्य । गुह्य प्रकट केले ।।२।।

अभंगी निरूपण । अनुभविले ज्ञान ।
आनंद शिवदासा । सर्व शुभ कल्याण ।।३।।

# आरती मन्मथस्वामींची

आरती मन्मथस्वामींची । संतशिरोमणी प्रमथांची ।।धृ.।।

त्यागूनि इष्टलिंग शिवा । मूढ आराधी अन्य देवा ।
जन्मूनि शिवाचार कुळी । रेखिती उभे गंध भाळी ।
असे जे भुलले वीरशैव, तयांना नीट, धीरपणे वाट, दाविली धर्माचरणाची... आरती... ।।१।।

कीर्तन-भजनाच्या छंदे । डोलती भक्त निजानंदे ।
निवडूनि परमरहस्यार्थ । दिधले भक्ता नवनीत ।
अंबर उठले गर्जून, शिव शिव घोषे, अति उल्हासे, फुलली मने भाविकांची... आरती...।।२।।

मन्मथ आला भूवरती । आता नाही तुम्हा भीती ।
ऐसे बोधूनि जनचित्ती । जागविली निर्मल शिवभक्ती ।
मन्मथरूपे शिव आले, लाविती 'शेष', भाळी निर्दोष, धूळ ती मन्मथचरणाची... आरती...।।३।।

शैवभारती शोधप्रतिष्ठान, डी.35/77 जंगमवाडीमठ, वाराणसी (उ.प्र.), स्थिरभाष : (0542) 2450546